# नवभारत

ऑगस्ट २०१३



- वंचितांची लावण्य अक्षरे
- महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे योगदान
- सरबजितसिंगच्या निमित्ताने
- ग्रेस यांच्या दोन कविता : 'डोळे' आणि 'दुपार'
- जैनेंद्रिय संज्ञा : एक तौलनिक अध्ययन
- कुसुमाग्रजांच्या पुतळाविषयक कविता : एक चिंतन









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**- संपादक मंडळ**

अनुक्रमणिका

वर्ष ६६। अंक ११। ऑगस्ट २०१३
आषाढ/श्रावण शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## ऑगस्ट २०१३

## अनुक्रमणिका

# वंचितांची लावण्य अक्षरे+

डॉ. चंद्रकांत प्रल्हाद पांढरीपांडे

आजचे हे साहित्य संमेलन एखाद्या शहरापुरते वा विभागापुरते मर्यादित नसून ते संपूर्ण मध्यप्रदेश स्तरावरील आहे, ही विशेष कौतुकाची बाब आहे. महाराष्ट्रापासून दूरवर पसरलेल्या बृहन्महाराष्ट्रातील मराठी माणसांना आपल्या मराठी भाषेविषयी, साहित्याविषयी व संस्कृतीविषयी वाटणाऱ्या जिव्हाळ्याचे हे प्रतीक आहे. अशा प्रसंगी एकत्र येऊन आपण मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांविषयी पुनर्चिंतन करतो. परप्रांतात आपल्या भाषेचे जतन व संवर्धन करीत असताना मराठी साहित्याचा त्यासाठी कसा उपयोग करून घेता येईल, याचा गांभीर्याने विचार करतो. वेळप्रसंगी आपण साहित्यासंबंधी आत्मचिंतन करत असतो. हे आत्मचिंतन वस्तुनिष्ठ स्वरूपात झाले, तरच आपल्याला आज निर्माण होणारे मध्यप्रदेशातील मराठीतील साहित्य/वाङ्मय आपल्या मराठी भाषेच्या स्थैर्याला व संवर्धनाला कितपत उपयोगी पडत आहे, याचा बोध होईल; तसेच ते उपयोगी होण्यासाठी कोणत्या योजना व अपेक्षा बाळगाव्यात, याविषयी विचार करता येईल. थोडक्यात, मराठी भाषा आणि मराठी वाङ्मय यांची आज जाणवणारी दशा आणि दिशा ठरवायला अशा साहित्य संमेलनाची बृहन्महाराष्ट्रात तरी फार आवश्यकता वाटते.

भाषा आणि साहित्य या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. भाषा जिवंत असेल, तरच वाङ्मय निर्माण होईल. त्यामुळे वाङ्मयनिर्मिती हे त्या भाषेच्या जिवंतपणाचे लक्षण असते. विविध अंगांनी समृद्ध असलेले वाङ्मय हे त्या भाषेच्या समृद्धीचे द्योतक असते. या दृष्टीने मध्यप्रदेशातील मराठी साहित्याचा विचार होणे आवश्यक आहे.

भाषावार प्रांतरचनेचे धोरण स्वीकारल्यावर आजचा नवीन मध्यप्रदेश १९५६ साली अस्तित्वात आला. यात मध्यभारत, जुन्या मध्यप्रांतातील म्हणजे आजच्या महाराष्ट्रात समाविष्ट झालेल्या विदर्भाच्या उत्तर भागातील सीमावर्ती मराठी जिल्हे, विंध्याचल व महाकोशलचा प्रदेश यांचा समावेश करण्यात आला. त्यामुळे या नवीन मध्यप्रदेशात हिंदी भाषा बोलणाऱ्यांच्या नंतर मराठी भाषा बोलणाऱ्यांची संख्या सर्वाधिक आहे. वेगवेगळ्या प्रदेशांतून आलेल्या मराठी साहित्यिकांची संख्याही वाढली. साहित्यनिर्मितीलाही वेग आला. भोपाळ ही राजधानी असल्यामुळे अनेक मराठी लोक नोकरीच्या, उद्योगाच्या व व्यवसायाच्या निमित्ताने कायमचे वास्तव्याला आले. हळूहळू मराठी भाषा व साहित्याचे उपक्रम होऊ लागले.

माळव्यात इ. स. १७३१ नंतर पराक्रमी पहिल्या बाजीरावाच्या काळात इंदूर, देवास, धार, ग्वाल्हेर ही मराठी संस्थाने अस्तित्वात आली. या संस्थानांची राज्यभाषा व व्यवहारातील भाषा मराठी होती. इंदूरचे होळकर, देवासचे पवार, धारचे परमार व ग्वाल्हेरचे शिंदे या मराठी संस्थानिकांच्या काळात मराठी भाषा, संस्कृती आणि साहित्याला चांगले दिवस होते. इ. स. १८४१ मध्ये सरकारी शाळा सुरू करण्यात आल्या. महाराष्ट्रातील अनेक कर्त्या मराठी व्यक्तींना, साहित्यिकांना, कलावंतांना व विद्वानांना सन्मानाने बोलावले गेले. त्यांत प्रामुख्याने, कीर्तने, श्रीकृष्ण फाटक, रावजी टुल्लु, दादोबा पांडुरंग यांनी वाङ्मयीन चळवळीचा पाया घातला. नोकरीनिमित्ताने या संस्थानांत उदंड राजाश्रय मिळाला. ही संस्थाने मराठीची महाराष्ट्राबाहेरील सांस्कृतिक केंद्रे बनली. संस्थानिक हे मराठी असल्यामुळे मराठी साहित्याच्या निर्मितीला अनुकूल वातावरण मिळाले. कविता, कथा, कादंबरी, नाटक या व इतर विविध वाङ्मयप्रकारांच्या लेखनाला प्रोत्साहन मिळाले. एखाद्या भाषेला राजाश्रय लाभला, तर त्या भाषेतील साहित्यिकांनाही वाङ्मयनिर्मितीची प्रेरणा कशी

+ अध्यक्षीय भाषण : मध्यप्रदेश मराठी साहित्य संघ, सुवर्ण महोत्सव (२०१३) प्रसंगी आयोजित ७ वे प्रांतिक साहित्य संमेलन, भोपाळ (दि. ९ व १० फेब्रुवारी.)

उद्‌बोधक ठरते, याचे हे जिवंत उदाहरण आहे. इ. स. १८७५ हा आधुनिक मराठी वाङ्‌मयाचा आरंभ मानला, तर त्याही अगोदरच्या काळापासून मध्यभारतात मराठी वाङ्‌मयाच्या निर्मितीला सुरुवात झाली होती. इंदूरचे महादेव मोरेश्वर कुंटे यांनी 'राजा शिवाजी' हे स्वतंत्र काव्य सन १८६९ मध्ये लिहिले, तर सन १८७३ मध्ये इंदूरचे बालकृष्ण मल्हार हंस यांनी 'भागिरथी' व ग्वाल्हेरचे केशव वासुदेव बापट यांनी १८७४ मध्ये लिहिलेले 'रासपंचाध्यायी' ही स्वतंत्र काव्ये अवतरली. केशवसुतपूर्व काळापासून आजतागायत दीडशे वर्षांची परंपरा मध्यप्रदेशातील मराठी साहित्य वाङ्‌मयाला लाभली आहे.

त्या काळातील प्रतिभावंतांच्या वाङ्‌मयनिर्मितीच्या कार्याचे आदरपूर्वक व अभिमानपूर्ण स्मरण या प्रसंगी होणे स्वाभाविक्र आहे. कवी केशवसुतांनंतर स्वच्छंदवादी संप्रदायाची लाट मराठी साहित्यात आली. तिचे लोण मध्यभारतात पोचले. केशवसुत संप्रदायाच्या प्रभावाखाली इथेही काव्याची रचना होऊ लागली. त्यात प्रामुख्याने कवी व समीक्षक नरहर शंकर रहाळकर यांचा समावेश करावा लागेल. जेमतेम २४ वर्षांचे आयुष्य लाभलेले कवी दत्त-दत्तात्रय कोंडो घाटे-हे इंदूरच्या ख्रिश्चन कॉलेजमध्ये पदवीपरीक्षेसाठी विद्यार्थी म्हणून वास्तव्याला होते. ते १८९८ साली बी. ए. झाले. त्यांच्या 'नवे पान' या एकमेव काव्यसंग्रहात, नागपूरचे समीक्षक डॉ. मा. गो. देशमुख यांनी संपादिलेल्या एकूण ५१ कवितांपैकी, प्रारंभीच्या चार व शेवटच्या सात कविता सोडल्या, तर बाकीच्या सर्व कविता १८९७ व १८९८ साली इंदूरच्या वास्तव्यात लिहिल्या आहेत. त्यांतही १८९७ मधल्या ३० तर १८९८ मधल्या दहा कविता आहेत. कवी दत्त यांच्या एकूण ४० कवितांची रचना इंदूरच्या वास्तव्यात झाल्यामुळे वेगळ्या अर्थाने तेही मध्यप्रदेशाचे कवी ठरावेत, असे म्हणायला हरकत नाही. याच काळात चरित्र व इतिहासविषयक काव्यरचना करणारे अनेक प्रतिभावान कवी मान्यता पावले होते. त्यांत प्रामुख्याने एकनाथ जोशी करकंबकर, रा. दौ. गडकरी, लक्ष्मणशास्त्री गाडगे यांचा उल्लेख करावा लागेल. पुढील काळात महाराष्ट्रातील रविकिरण मंडळाच्या प्रभावाखाली नांदणारे विष्णू सरवटे, वि. ह. आपटे, जगन्नाथ टुल्लु, गंगाधर अभंग, धुंडीराज आष्टेवाले, विनायक मुळे आदींची कविता बहरू लागली.

केशवसुत संप्रदायापेक्षा वेगळे दर्शन घडविणाऱ्या कविवर्य भा. रा. तांबे यांच्या कवितांनी महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील रसिकांचे लक्ष वेधून घेतले. त्यांची कविता कोणत्याही प्रभावाखाली नांदणारी नव्हती. तांब्यांनी केशवसुतांनंतर सुमारे ६ वर्षांनी काव्यलेखनाला आरंभ केला. तांबे केशवसुतांच्या काळात व केशवसुतांनंतर ३६ वर्षे काव्यरचना करीत होते. कलावादी तांब्यांनी काव्याच्या क्षेत्रात 'तांबेसंप्रदाय' निर्माण केला. केवळ मध्यप्रदेशच नव्हे, तर महाराष्ट्रातही अनेक कवींवर कवी तांबेंचा प्रभाव पडला. तांबे यांचे समकालीन कवी भालचंद्र लोवलेकर, गोविंद झोकरकर व रा. अ. काळले हे तांबेसंप्रदायातील प्रमुख कवी होत. त्या काळात कवी लोवलेकरांच्या कवितेचे चाहते महाराष्ट्रातील कवयित्री शांता शेळके, कवी बा. भ. बोरकर, ना. धों. महानोर आदी साहित्यिक होते. या सगळ्या कवींची महाराष्ट्रातील साहित्यप्रेमी मंडळींनी योग्य दखल घेतली.

यानंतरच्या पिढीत अगदी आजपावेतो अनेक कवींनी मराठी काव्याचे दालन समृद्ध केले. त्या सर्वांचा अध्यक्षीय भाषणात, वेळेअभावी उल्लेख करणे शक्य नाही. तसा शिरस्ताही नाही. परंतु इथल्या काव्यसंपदेत ज्यांनी मोलाची भर घातली व ज्यांनी आपल्या काव्यरचनेद्वारे कवितेला वेगळा आयाम दिला, त्यांत प्रामुख्याने इंदूरचे ज्येष्ठ कवी अनंत पोतदार, श्रीकृष्ण बेडेकर, वसंत काळेले, अलकनंदा साने, शोभा तेलंग, चंद्रकांत जोशी, अरुणा खरगोणकर, सुधीर बापट व श्रीकांत तारे आहेत. भोपाळला स्थायिक झालेले कवी माधव जामदार, निशिकांत करकरे, बा. ना. पेंढरकर, डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे, अनिल निगुडकर, मंदा गंधे, सुषमा ठाकूर, प्रतिभा गुर्जर व अनुराधा जामदार आहेत. मध्यप्रदेशात 'बहरून ये जरासा' हा मराठी गझलांचा स्वतंत्र काव्यसंग्रह प्रकाशित करणाऱ्या शोभा तेलंग मध्यप्रदेशातील गझल लिहिणाऱ्या पहिल्या कवयित्री आहेत. उमरखय्यामच्या रुबायांची 'मधुवल्लरी या नावाने मराठीत रचना करणारे माधव साठे हे मध्यप्रदेशातील एकमेव कवी आहेत. भोपाळला नवीन पिढीतले कवी माधव जामदार यांनी ५ कविता-संग्रह आणि ५ भावानुवाद प्रकाशित केलेत. कवी

अनुक्रमणिका

कालिदासांच्या मेघदूताचा रसाळ भावानुवाद करणारे ते मध्यप्रदेशातील एकमेव कवी आहेत. त्यांची कविता जेवढी संख्येने विपुल, तेवढीच काव्यगुणांनी बहरलेली आहे. निशिकांत करकरे यांचा छंदःशास्त्राचा गाढा अभ्यास असून कवितेबरोबरच छंदःशास्त्रावरचे त्यांचे अनेक लेख छंद मासिकातून प्रकाशित झालेत. डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे यांच्या 'बंदिस्त हाक' या काव्यसंग्रहाचा इंग्रजी भावानुवाद The Muffed Outcry या नावाने पुढील महिन्यात दिल्ली येथून प्रकाशित होत आहे. यापूर्वी मराठी काव्यसंग्रहाचा इंग्रजीतून होणारा भावानुवाद मध्य-प्रदेशातल्या कुठल्याही कवीचा झालेला नाही. संपूर्णपणे विनोदी काव्यसंग्रह प्रकाशित केलेले ग्वाल्हेरचे व आता भोपाळला स्थायिक झालेले कवी अनिल निगुडकर हे एकमेव कवी आहेत. उज्जयिनीचे ज्येष्ठ कवी के. ना. डांगे, डॉ. अपर्णा जोशी व डॉ. वि. मा. पागे, ग्वाल्हेरचे कै. निशिकांत कालगांवकर, कमलाकर बुचके, जबलपूरचे डॉ. शरद महाजन तर बुऱ्हाणपुरचे कवी जयंत भालेराव यांचे कवितेच्या क्षेत्रातील योगदान उल्लेखनीय आहे. अनवधानाने काही श्रेष्ठ कवींचे उल्लेख आले नसतील, तर त्यांनी मला क्षमा करावी.

१९ व्या शतकाच्या शेवटी व २० व्या शतकाच्या सुरुवातीला मध्यभारतात ऐतिहासिक दीर्घकथा वा लघुकादंबरीस्वरूपाच्या कथा जशा पुस्तकरूपाने प्रकाशित झाल्यात, तसे सामाजिक कथांचे संग्रह फार मोठ्या संख्येने प्रकाशित झाले नाहीत. पहिले ऐतिहासिक कादंबरीरूप दीर्घकथन अनंत नारायण भागवत यांनी 'वसईचा मोहरा' नावाने सन १८९४ मध्ये प्रसिद्ध केले. अशीच दीर्घ सामाजिक कथा रतलामचे गोविंद विनायक रत्नपारखी यांनी सन १९१२ मध्ये लिहिल्याचे समजते. अलीकडच्या काळात मध्यप्रदेशातील लघुकथांचे दालन ज्यांनी समृद्ध केले, त्यांत भोपाळचे श्रीनिवास कोचकर, मालती जोशी, लीला श्रीवास्तव, इंदूरच्या रोहिणी कुलकर्णी; गीता सप्रे, कल्पना शुद्ध-वैशाख, उज्जयिनीच्या जान्हवी संत यांचे कथालेखन महाराष्ट्रातील दर्जेदार मासिकांतून प्रकाशित झाले आहे. स्त्रियांची दुःखे व होणारी घुसमट स्त्रीलेखिकांनी मांडली; पण स्त्रीमुक्तीच्या आग्रही भूमिकेचा विचार त्यांच्या कथांतून प्रभावीपणे अभिव्यक्त होत नाही. कथालेखनामध्ये इंदूरचे डॉ. प्र. ना. कवठेकरांनी 'ध्वनी कथा' हा कथालेखनाचा नावीन्यपूर्ण प्रकार लिहून वेगळा ठसा उमटविला. कथालेखनात इंदूरचे कथालेखक संख्येने जास्त दिसून येतात. मध्यप्रदेशात कथा या वाङ्मयप्रकाराचे लेखन सातत्याने होत असले, तरी संख्येने त्या कमीच आहेत.

सामाजिक, ऐतिहासिक व काल्पनिक अशा तीनही प्रकारच्या कादंबऱ्यांचे लेखन तसे संख्येने कमीच झाले आहे. मध्यभारतातली अगदी पहिली कादंबरी 'हारदानिष' ही आहे. ती पूर्णतः काल्पनिक कादंबरी होती. तिची रचना सन १८८० मध्ये झाली. पहिली इंग्रजीवरून बेतलेली ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याचे श्रेय इंदूरचे नारायण विनायक गणपुले यांना जाते. त्यांनी १८८६ मध्ये, 'श्रीप्रतापसिंगजी छत्रपती महाराणा संस्थान उदेपूर' या कादंबरीचे लेखन केले. सामाजिक कादंबरीलेखनाचा प्रथममान १९०१ मध्ये 'दुःखाअंती सुख' ही कादंबरी लिहून अनंत भागवत यांनी पटकावला. अलीकडे नवीन पिढीतील लेखकांनी कादंबरीलेखनाचे तुरळक प्रयत्न केलेत. त्यांत प्रामुख्याने भोपाळचे ना. ल. वैद्य, इंदूरच्या रोहिणी कुलकर्णी , पद्मजा नायडू, डॉ. शशिकांत जोशी, निरंजन जमीदार, लीला श्रीवास्तव, प्रफुलत्ता जाधव आणि माधव साठे यांचे कादंबरीलेखनातील स्थान उल्लेखनीय आहे. अलीकडे नवीन पिढीत ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून माधव साठे त्यांच्या 'ब्रह्मावर्त' या कादंबरीमुळे केवळ महाराष्ट्रातच नव्हे, तर हिंदी साहित्यविश्वातही विख्यात झालेत. त्यांच्या या कादंबरीचा त्यांनी स्वतःच केलेला हिंदी अनुवाद अलीकडे भारतीय ज्ञानपीठ, दिल्ली यांनी प्रकाशित केला असून त्याला हिंदी रसिकांनी प्रचंड प्रतिसाद दिल्याचे कळते.

नाट्यलेखनाच्या क्षेत्रात नाव घेण्याजोगती निर्मिती झालेली दिसत नाही. मध्यभारतातील पहिले नाटक 'टेम्पेस्ट' हे शेक्सपियरच्या 'टेम्पेस्ट' या नाटकाचे भाषांतर असून ते नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनी सन १८७५ मध्ये लिहिले. कालदृष्ट्या पहिले पौराणिक नाटक ग्वाल्हेरचे प्रो. बाळकृष्ण रामचंद्र बोकील यांनी सन १९१७ मध्ये लिहिलेले 'रुक्मांगद मोहिनी' हे ठरते. ऐतिहासिक नाटक 'रावबाजी अथवा महाराष्ट्राचे जनक' हे १९०१ साली

अनंत नारायण भागवत यांनी लिहिलेले पहिले नाटक ठरते, तर सामाजिक नाटकाचा पहिला मान प्रो. बाळकृष्ण रामचंद्र बोकिल यांच्या १९०७ साली इंग्रजी नाटकाच्या आधारे लिहिलेल्या 'कमलिनी' नाटकाकडे जातो. अलीकडे नवीन पिढीत ना. ल. वैद्य, बाबा डिके, गणेश मतकर, प्रा. जोगळेकर, श्रीकृष्ण बेडेकर, श्रीनिवास कोचकर व प्रभाकर कोचकर यांची नाट्यसंहिता, प्रयोगक्षमताच्या दृष्टीने रंगभूमीवर यशस्वी ठरली. नाट्यलेखनापेक्षा रंगभूमीवर नाटक सादर करणारी बाबा डिके यांची इंदूर येथील 'नाट्यभारती' व ग्वाल्हेरच्या 'आर्टिस्ट कंबाइन' संस्थेने मध्यप्रदेशात व महाराष्ट्रात नाट्यस्पर्धेत भाग घेऊन पारितोषिके मिळविलीत. गणेश मतकर यांचे 'जावे त्यांच्या वंशा' हे नाटक दलित नाटकांत मोडणारे एकमेव नाटक आहे. मध्यभारतातील संस्थानिकांनी महाराष्ट्रातील नाटक कंपन्यांना बोलावून इंदूर, देवास व ग्वाल्हेरला मराठी रंगभूमी निर्माण केली. त्यामुळे आयत्याच प्रयोगक्षम नाटकांना बघण्याची संधी मिळत राहिल्याने नाट्यलेखनाचे क्षेत्र दुर्लक्षित झाले असावे, असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

चरित्रे व घराण्याचे इतिवृत्त लिहिण्यामागची प्रेरणा इथल्या संस्थानिकांनी निर्माण केली, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. आपल्या कर्तृत्वाचा परिचय जनमानसात व्हावा, या हेतूने शिंदे, होळकर, धार येथील संस्थानिकांनी स्थानिक साहित्यिकांकरवी घराण्याचे इतिवृत्त व चरित्रग्रंथलेखनाला प्रोत्साहित केले. महाराष्ट्रातून व संस्थानाच्या दरबारातील जुनी बाडे एकत्रित करून इंग्रजीतून घराण्याचे इतिवृत्त व चरित्रे लिहिण्याचा शिरस्ता पाळला. सन १८६४ मध्ये ग्वाल्हेरचे शंकर तात्या फडके यांनी 'शिंद्याचे घराण्याचा इतिहास' प्रसिद्ध केलेला ग्रंथ पहिला ठरतो. देवास व धार या दोन्ही राजघराण्यांचा एकत्र इतिहास सर्वप्रथम देवासच्या मराठी शाळेचे हेडमास्तर विश्वनाथ काशिनाथ फडके यांनी सन १८९४ मध्ये लिहून 'परमार घराण्याचा इतिहास' या नावाने प्रसिद्ध केला. इंदूरच्या होळकर घराण्याचा इतिहास 'इंदूर संस्थानची बखर' या नावाने इ. स. १९०० मध्ये प्रकाशित झाला. या ग्रंथाचे लेखक धोंडो मोरेश्वर राजे हे इंदूर राज्यात नोकरीला असलेले वृद्ध कारकून होते. मध्यभारतात पहिले चरित्रलेखक होण्याचा मान इंदूरचे मुरलीधर मल्हारराव अत्रे यांना जातो. त्यांनी 'मल्हारराव होळकर' या चरित्रग्रंथाचे प्रकाशन १८९२ साली केले. इंदूरच्या होळकर घराण्यातील काही पुरुष व स्त्रीरत्नांची अभ्यासपूर्ण चरित्रे डॉ. गणेश मतकर यांनी अलीकडच्या काळात लिहून चरित्रवाङ्मयात मोलाची भर टाकली. नवीन पिढीतील चरित्रलेखनाचे उल्लेखनीय कार्य बाळ ऊर्ध्वरेषे, मनोहर देव, ना. वा. मुळे, माधव साठे व डॉ. वामनराव पाठक यांनी केले. माधव साठे यांनी १८५७ च्या क्रांतीत सक्रिय असलेले नानासाहेब पेशवे यांचे चरित्र स्वतः प्रथम इंग्रजीतून Invincible Hero या नावाने लिहिले. ते नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया दिल्ली, प्रकाशित करणार आहे. ही उल्लेखनीय बाब आहे. आत्मचरित्राचे दालन मात्र जवळजवळ रिकामेच आहे. मध्यप्रदेशाचे मुख्य न्यायाधीश व लोकायुक्त न्या. प्र. के. तारे यांच्या Revolution to Evolution 1995 या आत्मचरित्राचा मराठी अनुवाद प्रा. प्र. रा बोधनकर यांनी केला आहे. त्यापूर्वी प्रभाकर वामन ऊर्ध्वरेषे यांचे 'हरवलेले दिवस' हे आत्मचरित्र १९८९ मध्ये प्रकाशित झाले होते.

वाङ्मयीन समीक्षेचे लेखन मोजकेच असले, तरी ते समीक्षेच्या प्रांतात मोलाची भर घालणारे आहे. आद्य समीक्षकाचा मान इंदूरचे बा. म. हंस यांच्याकडे जातो. त्यांनी महाराष्ट्रातील मोरोपंत, वामन पंडित, तुकाराम, रामदास आदींच्या काव्यावर अभ्यासपूर्ण समीक्षात्मक लिखाण केले. 'रसप्रबोध' हे साहित्यशास्त्रावरील पहिले पुस्तक उज्जयिनीचे बळवंत कमलाकर माकोडे यांनी १८९२ मध्ये प्रकाशित केले होते. मध्यभारतातले 'भाषाशास्त्र आणि सौंदर्य' या विषयावरचे पुस्तक धारचे सदाशिव बापूजी कुलकर्णी यांनी सन १९०८ मध्ये लिहिले. इ. स. १९३६ पूर्वी भाषाशास्त्र, शुद्धलेखनसुधारणा, शास्त्रीय मराठी व्याकरण, म्हणी आदी विषयांवरची एकूण ७ पुस्तके प्रसिद्ध झालीत. मोरो केशव दामले यांनी उज्जयिनीत वास्तव्याला असताना लिहिलेला 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा ग्रंथ सन १९११ मध्ये प्रसिद्ध केला. व्याकरणकार मोरोपंत हे कवी केशवसुतांचे वडीलबंधू होत. मोरोपंत दामल्यांच्या बरेच वर्षे आधी ग्वाल्हेरचे हरिशास्त्री थत्ते यांनी व्याकरणावर ग्रंथ लिहिला

होता; परंतु त्यासंबंधी विशेष माहिती उपलब्ध नाही. इंदूरचे जगन्नाथ रावजी टुल्लु यांचे 'मराठी भाषेचा इतिहास' १९१४, हे मराठी साहित्याच्या त्रोटक इतिहासलेखनात गणले जाते. इंदूरचे वि. सी. सरवटे यांनी आधुनिक मराठी वाङ्मयाचा परामर्श घेणारा 'मराठी साहित्य समालोचन' हा ग्रंथ ४ खंडांत प्रकाशित केला. देवासचे प्रसिद्ध साहित्यिक कृ. ग. कवचाळे व इंदूरचे डॉ. अनिल गजभिये यांचे या मराठी वाङ्मयेइतिहासाच्या क्षेत्रातील योगदान अविस्मरणीय आहे. 'कला व नीती' यांवरील कवी भा. रा. तांबे यांची पुस्तके, ग. वा. कवीश्वर यांचे 'नीती व कलोपासना' ही पुस्तके गाजलीत. अलीकडे रा. अ. काळेले व कवी रहाळकर वगळता समीक्षेविषयी चर्चा करणारा, नवीन पिढीतील लेखकांनी लिहिलेला, स्वतंत्र समीक्षाग्रंथ नाही. परंतु प्रसंगोपात्त त्यांनी स्फुट स्वरूपाची समीक्षा काव्यसंग्रहावरील प्रस्तावनांतून, नियतकालिकांतून व वर्तमानपत्रांतून केलेली आहे. अशी उपयोजित समीक्षा अनंत पोतदार, वसुधा ढवळीकर, डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे, डॉ. दा.ल. अडोणी, डॉ. शशिकांत सावंत, डॉ. वि. मा. पागे, रा. अ. काळेले, माधव साठे, डॉ. अपर्णा जोशी, निशिकांत करकरे, डॉ. अनिल गजभिये, डॉ. गो. मो. रानडे, डॉ. केशव कान्हेरे व डॉ. वामनराव पाठक यांनी केलेली आहे.

निबंध आणि ललित निबंध या वाङ्मयप्रकाराचे लेखन अभावानेच झाले. यामागची कारणे वाङ्मयेतिहास लेखकाने शोधायला हवीत. वेगवेगळ्या विषयांवरील वैचारिक चिंतनशीलता व जीवनानुभवांचे लालित्यपूर्ण गद्यलेखनाचे दालन अजूनही रिकामेच आहे. अलीकडे धर्म, अध्यात्म, पुराणांतील मिथके यांसंबंधीचे वैचारिक लेखन इंदूरचे सर्वश्री ग. वा. कवीश्वर, प्र. गो. घाटे, डॉ. कवठेकर, उज्जयिनीचे डॉ. वि. मा. पागे, बा. ना. मुण्डे, डॉ. दाभाडे, भोपाळचे अरुण पांढरीपांडे, खण्डव्याचे दीपक चैतन्य, जबलपूरचे गो. मो. रानडे व ग्वाल्हेरचे डॉ. दिवेकर यांनी केलेले आहे.

मध्यप्रदेशात अजूनही दलित व ग्रामीण साहित्याची निर्मिती जवळजवळ नगण्यच आहे. त्यात डॉ. अनिल गजभिये हे एकमेव एकांडे शिलेदार दिसतात. खरंतर महाराष्ट्र आणि मध्यप्रदेशाच्या सीमावर्ती प्रदेशात आदिवासी, दलित व उपेक्षित समाज सातपुड्याच्या पठारावर आज अनेक शतकांपासून नांदत आहे. तसेच नर्मदा व तापी या नद्यांच्या सखल व डोंगराळ प्रदेशांत ते वास्तव्याला असून आपला व्यवहार मराठीतूनच करतात. प्रामुख्याने या भूप्रदेशात वऱ्हाडी बोली हिंदी-मिश्रित स्वरूपात बोलली जाते. या उपेक्षितांच्या जीवनातील कथा आणि व्यथांना ललित लेखनातून बोलके करण्याची नितान्त आवश्यकता आहे. तसे झाल्यास मध्यप्रदेशातील मराठी दलित साहित्याचा प्रवाह अधिक समृद्ध होऊन वाहू लागेल. मी केवळ मराठीभाषिक दलितांविषयी बोलत नाही. सीमावर्ती प्रदेशात द्विभाषिक संस्कृती नांदत असते. त्या सर्वांना बोलके करण्याची गरज आहे. दलित हा हिंदीभाषिक असला, तरी काय हरकत आहे? वेदनेला भाषा नसते. तिला अंतःकरणाची भाषा समजते, हेच खरे!

मध्यप्रदेश ही माझी कर्मभूमी आहे. इथल्या ३५ वर्षांच्या दीर्घ वास्तव्यात एक गोष्ट आढळली, साहित्याचे नाव काढले, की अनेक मराठी व्यक्ती 'आम्हाला साहित्यातले काहीच समजत नाही', असे म्हणून नामानिराळ्या होत असत. अर्थात साहित्याबद्दल उदासीन वृत्तीच दिसून आली. या उदासीन वृत्तीतही मराठी साहित्याबद्दल आदरयुक्त प्रेमभाव असायचा. खरंतर साहित्य म्हणजे काय, हे जाणून घेण्याचा त्यांनी प्रयत्नच केलेला नसतो. आपण जगत असताना सभोवताली घडणाऱ्या घटनांचा, परिस्थितीचा, वातावरणाचा, संस्कृती आदींच्या अनुभवजन्य जाणिवांचा एखाद्या कवी, लेखक, कादंबरीकार, नाटककार याने अधोरेखित केलेला तो आलेख असतो. अगदी सहजसोप्या भाषेत सांगायचे म्हणजे साहित्याच्या वाचनातून आपण आपल्या अनुभूतीला कलात्मक पातळीवरून पुनः अनुभवण्याचा आनंद घेत असतो. त्या वेळी जगण्यातल्या साऱ्या प्रमेयांचे, संदर्भांचे व जाणिवांचे पदर उलगडत जातात. साहित्याचे वाचन हे वाचकाची जगण्याची भूमिका निश्चित करते. त्याच्या जगण्याला अर्थ देते. तेव्हा 'वाचाल तर वाचाल!', या वाचनसंस्कृतीतल्या उक्तीतला गर्भितार्थ इथे कळतो. पिढ्यान् पिढ्या अनेक मराठी कुटुंबे मध्यप्रदेशात राहत

आहेत. या दीर्घकालीन वास्तव्यामुळे त्यांचे अनुभव हे निश्चितच भाषिक व सांस्कृतिक दृष्ट्या संमिश्र स्वरूपाचे असणार. ते बऱ्याच अंशी वेगळे असणार. या वेगळेपणातच त्याचे वैशिष्ट्य आहे. अनुभवाचे हे वेगळेपण प्रमाणित मराठीतूनच अभिव्यक्त करण्याचा अट्टहास इथल्या साहित्यिक लेखकांनी करू नये, असे मला प्रामाणिकपणे वाटते. इथल्या मराठीवर होणाऱ्या हिंदी भाषेच्या प्रभावाचा मोकळ्या मनाने स्वीकार करायला हवा. अलीकडे महाराष्ट्रातल्या प्रमाणित भाषेतही बोली भाषेतील अनेक शब्दांचा, विशेषणांचा, वाक्यप्रयोग व म्हणींचा वापर होत आहे. प्रत्यक्ष प्रमाणित भाषेत अरबी, फारशी, उर्दू, इंग्रजी भाषेतील शब्दांच्या वापराला मान्यता मिळालेली आहे. उदाहरणादाखल दरवाजा, तलवार, खबरदार, वार्ता, रजा, टेबल, खुर्ची यांसारख्या अनेक शब्दांना व्यवहारात मान्यता मिळाली आहे. त्यामुळे मराठीच्या भाषिक सौंदर्यात अधिकच भर पडते. भाषा ही प्रवाही असते. तिला साचलेल्या डबक्याचे स्वरूप येऊ लागले, तर तिचे बाष्पीभवन होऊन ती संपून जाणार. तेव्हा इथल्या साहित्यिक मंडळींनी त्यांच्या लेखन-अभिव्यक्तीत हिंदी, उर्दू या भाषेतील शब्दांचा, विशेषणांचा, म्हणींचा अंतर्भाव केला, तर तो इथल्या संमिश्र सांस्कृतिक अनुभवांना अधोरेखित करताना खऱ्या अर्थाने न्याय देईल. इथल्या मराठी साहित्याच्या अभिव्यक्तीत हिंदी व उर्दू भाषेच्या रचनेचा डौल आला, तर इथली मराठी अधिक समृद्ध होईल. पण याचा अर्थ असा नव्हे, की मराठी भाषेचे 'मराठीपण' गमावून साहित्याचे लेखन करावे. भाषाशास्त्रज्ञ म्हणतात, की भाषेत शुद्ध, अशुद्ध, चांगली वा वाईट हा भाग नसतोच. भाषा ही फक्त भाषाच असते. तेव्हा लिहिते व्हा. मराठी जाणकारांकडून तुमचे लेखन तपासून घ्या. अशा साहित्यकृतीचा गंध मराठीला वेगळ्या अंगाने समृद्ध करेल.

एवढी प्रदीर्घ परंपरा मध्यप्रदेशातल्या मराठी साहित्याला लाभूनही तिची फारशी दखल अजूनही घेतली जात नाही, ही वस्तुस्थिती आहे. हे शल्य कवी नरहर शंकर रहाळकर व कृ. ग. कवचाळेंपासून आजपावेतो अनेक साहित्यिकांनी व्यक्त केले आहे. महाराष्ट्रापासून दूर प्रदेशातील ही माणसे आपली मराठी भाषा, संस्कृती व साहित्याची सेवा करीत तिच्या अस्तित्वासाठी संघर्ष करतात याची दखलसुद्धा महाराष्ट्रातल्या विचारवंतांना, साहित्यिकांना घ्यावीशी वाटू नये, ही उपेक्षा अधिक बोचरी आहे. इथल्या साहित्यलेखनाला मासिकांतून, नियतकालिकांतून व वाङ्मयाच्या इतिहासातही फारशी प्रसिद्धी मिळत नाही, ही बाब अत्यंत खेदाची आहे. वेळोवेळी यावर चर्चा होतात; पण परिस्थिती 'जैसे थे'च असते. या सर्वांतून मार्ग काढण्यासाठी गेल्या १३ वर्षांपासून इंदूरला "श्री सर्वोत्तम" नावाचे त्रैमासिक काढण्यात येते. त्यात मध्यप्रदेशातील साहित्यिकांना व लेखकांना वाव मिळावा ही दृष्टी तर आहेच; पण महाराष्ट्रातील लेखकांनाही त्यात वाव देण्यात येतो, अशी उदारवादी भूमिका स्वीकारली आहे.

हा समग्र मराठी साहित्याचा धावता आढावा घेताना माझ्या मनात काही प्रश्न उपस्थित होताहेत. हे मध्यप्रदेशातील समग्र मराठी वाङ्मयाच्या इतिहास-लेखनाविषयी आहेत. इंदूर येथील वि. सी. सरवटे यांचा 'आधुनिक मराठी साहित्याचे समालोचन' करणारा वाङ्मयेतिहासातील उल्लेखनीय ग्रंथ आहे. त्यापाठोपाठ देवासचे ज्येष्ठ लेखक श्री. कृ. ग. कवचाळे यांचा 'मध्यभारतीय मराठी वाङ्मय: १८६१-१९३६' हा मध्यभारतातील साहित्यकृतींची विस्ताराने दखल घेणारा ग्रंथ आहे. अगदी अलीकडे डॉ. अनिल गजभिये यांनी 'मध्यप्रदेशीय मराठी साहित्याचा परामर्शः १९३७-२००१', हा ग्रंथ २००३ साली प्रकाशित केला. डॉ. गजभिये यांनी राज्यपुनर्रचनेनंतर निर्माण झालेल्या नवीन मध्यप्रदेशातील साहित्याचा परामर्श यात आवर्जून घेतला आहे. हे तीनही ग्रंथ मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे पुढील काळात लेखन करताना अभ्यासकांना मार्गदर्शक ठरणार आहेत.

वाङ्मयाचा इतिहास म्हणजे विखुरलेली साहित्यसामग्री एकत्रित करून, तिचे वर्गीकरण करून त्याचा धावता आढावा घेणे नव्हे. वाङ्मयेतिहास हा एका व्यक्तीने लिहिलेला असो वा साहित्यप्रकारपरत्वे अनेकांकडून लिहून घेतलेला असो; त्याचे लेखन करण्यापूर्वी उपलब्ध साहित्यसामग्रीची व्यवस्था लावताना त्याबाबत लेखकाने एखादा दृष्टिकोण निश्चित केलेला असावा. त्या आधारेच वाङ्मयेतिहासाचे लेखन व्हायला

हवे.

हा दृष्टिकोण वाङ्मयाचे 'वाङ्मयपण' अधोरेखित करणारा असायला हवा. अन्यथा तो वाङ्मयेतिहास होणार नाही. पण हेही म्हणणे पूर्णपणे खरे म्हणता येणार नाही. कारण कोणतीही साहित्यकृती ही विशिष्ट कालखंडात निर्माण झालेली असते. तिचा लेखकही त्याच काळात वावरत असतो. तो त्या काळातील समाजात वावरत असतो. त्या समाजजीवनाशी त्याचे वैचारिक आणि भावनिक संबंध निर्माण झालेले असतात. त्या काळातील सामाजिक, आर्थिक, राजकीय, ऐतिहासिक, धार्मिक व पारंपरिक प्रवाहांचा प्रभाव लेखकावर व पर्यायाने त्याच्या साहित्यकृतीवर पडत असतो. या प्रभावातूनच त्या त्या काळातील साहित्याच्या प्रेरणा, हेतू व प्रकार यांचा संभव होत असतो. साहित्य हे समाजातच निर्माण होते व तिचा लेखकही समाजाचाच घटक असतो. त्यामुळे लेखकाचे जीवनानुभव हे त्याच्या या साऱ्या एकत्रित प्रभावातून निर्माण होतात.

वाङ्मयेतिहासात वाङ्मय आणि इतिहास हे दोन घटक महत्त्वाचे असतात. इथे 'इतिहास' याचा अर्थ घडून गेलेल्या सामाजिक, राजकीय इत्यादी घटनांचा स्थितिशील इतिहास नव्हे. कारण अशा इतिहासातील घटना या भूतकाळात समाविष्ट झालेल्या असतात. पण तसे वाङ्मयेतिहासात घडत नाही. कारण वाङ्मय ही केवळ घडून गेलेली मृत घटना नसते, तर तिचा प्रवाह अखंडपणे वाहत असतो. वेगवेगळ्या काळांत त्या वाङ्मयीन कृतींचा वेगळ्या अंगाने शोध घेण्याची गरज उत्पन्न होत असते.

जगण्याची व समाजाची नित्य आणि नैमित्तिक मूल्ये असतात. नैमित्तिक मूल्ये त्या त्या काळात बदलली, की साहित्यनिर्मितीच्या प्रेरणांचे स्वरूप व प्रकारही बदलतात. त्यामुळे या सगळ्यांचे भान वाङ्मयेतिहासाच्या लेखकाला असावे लागते. यासाठी वाङ्मयेतिहास-काराला जसा वर्तमानकाळातील साहित्याचा परामर्श घ्यावा लागतो, तसाच तो भूतकाळातील साहित्याचाही घ्यावा लागतो. तेव्हा वाङ्मयाचा इतिहास लिहिताना वाङ्मयाचे वाङ्मयपण अधोरेखित करीत भूतकाळाला व त्यातील साहित्याला नव्याने समजून घ्यावे लागते व त्याची मांडणी करावी लागते.

वरील विवेचनाच्या संदर्भात एक विशेष मुद्दा मांडावासा वाटतो. मध्यभारतातील साहित्यनिर्मिती ही महाराष्ट्रापासून दूर असलेल्या प्रदेशात निर्माण होत होती. नवीन मध्यप्रदेशही तेवढाच दूर आहे. त्या काळात मध्यभारतात मराठी संस्थाने होती. ती सरंजामशाही व सामंतवादी व्यवस्थेची द्योतक होती. मराठी ही राजभाषा होती. हिंदी मुलखात असूनही ती व्यवहारातली भाषा होती. इथली सामाजिकता, राजकीयता, परंपरा, व्यवस्था या पूर्णपणे मराठी नव्हत्या. सभोवती असणाऱ्या हिंदी भाषेच्या सांस्कृतिक वातावरणात त्या नांदत होत्या. तेव्हा इथल्या मराठी साहित्येतिहासाचे लेखन करताना साहित्यनिर्मितीच्या प्रेरणा, प्रभाव व परंपरा यांचा निश्चितच वेगळ्या अंगाने शोध घ्यावा लागेल. त्यामुळे आजच्या मध्यप्रदेशातील मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिताना त्याचे महाराष्ट्रातील मराठी वाङ्मयेतिहासापेक्षा असणारे पृथकत्व अधोरेखित करायला हवे, असे मला वाटते. वाङ्मयेतिहासाचे लेखन कालौघात पुन्हा पुन्हा करावे लागते. अलीकडेच हा वाङ्मयलेखनाचा प्रकल्प इंदूरच्या महाराष्ट्र साहित्य सभेने हाती घेतल्याचे कळले. ही एक आवश्यक बाब होती. नवीन मध्यप्रदेशात होणारे ललित लेखन हे प्रामुख्याने इंदूर, भोपाळ, देवास, ग्वाल्हेर, जबलपूर, रतलाम, बऱ्हाणपूर अशा मोठ्या शहरांतून राहणाऱ्या लेखकांकडून होत आहे, ही विशेष आनंदाची बाब आहे. पण सीमावर्ती प्रदेशातल्या छिंदवाडा, सिवनी, बैतूल, मुळताणी, पांढुरना, भैसदेही, हरदा, खांडवा, बऱ्हाणपूर व अशाच काही ठिकाणी मराठी कुटुंबे तीनशे-चारशे वर्षांपासून नांदत आहेत. मुद्रण व प्रकाशनाच्या सोयीअभावी त्यांचे साहित्य लोकांसमोर येत नाही. त्यांच्या लेखनाचीही दखल पुढील वाङ्मयेतिहासकाराला घ्यावी लागेल, असे नमूद करावेसे वाटते.

या संमेलनाच्या निमित्ताने मला एक अतिशय महत्त्वाचा प्रश्न आपल्या सर्वांसमोर मांडायचा आहे. मध्यप्रदेशातल्या सर्व मराठी भाषिकांनी त्याचा गांभीर्याने विचार करावा, असे मला वाटते. तो प्रश्न आहे मराठी भाषेच्या अस्तित्वाचा. भाषेचे अस्तित्वच संपुष्टात येत असेल, तर मराठी साहित्य कसे निर्माण होणार? भाषा

आणि साहित्य परस्परावलंबी आहेत. मराठी साहित्य टिकवायचे असेल, तर सर्वप्रथम मराठी भाषा टिकायला हवी. ती टिकली तरच मराठी साहित्य आणि मराठी संस्कृती टिकेल. तेव्हा मराठीच्या अस्तित्वाचा प्रश्न हा सर्वांत महत्त्वाचा आहे. मराठी संस्थानांत मराठी ही राज्यभाषाव्यवहाराची भाषा होती, तोपर्यंत सर्व अनुकूल होते. सरकारदरबारी तिला प्रोत्साहन मिळत होते. होळकर, शिंदे व पवार यांनी मराठीच्या शिक्षणाच्या सोयी उपलब्ध करून दिल्या. शालेय शिक्षणात मराठीच्या अध्ययन-अध्यापनाच्या सोयी होत्या. त्यामुळे मराठीला व साहित्याला सुगीचे दिवस आले होते. त्यातून साहित्यिकांची एक पिढीच निर्माण झाली. त्यांनी इथल्या मराठी साहित्याचे दालन समृद्ध केले. त्यामुळे आधुनिक मराठी वाङ्मयाचा एक समृद्ध वारसा निर्माण झाला. परंतु ही परिस्थिती १९५६ नंतर बदलली. मध्यप्रदेश हा हिंदीभाषिक प्रांत झाला. त्यामुळे सुरुवातीला मराठी भाषेला मिळणाऱ्या सवलती कालांतराने कमी होऊ लागल्या. हळूहळू मराठी शाळा बंद होत गेल्या. मराठी भाषा शिकून विद्याविभूषित होणारी नवीन पिढी निर्माण होणे दुरापास्त झाले. मराठी भाषेचे अध्ययन व अध्यापन होत नसेल, तर वाचन आणि लेखनसंस्कृती कशी टिकणार? यामागचे मुख्य कारण म्हणजे मराठीचे अध्ययन हे अर्थार्जनाचे साधन राहिले नाही. परिणामी मराठी कुटुंबात मराठीला सापत्नभावाची वागणूक मिळू लागली. आतातर कुटुंबातील नवीन पिढीला मराठी बोललेले तर समजते; पण नीट बोलणे, वाचणे व लिहिणे जमत नाही. घरातल्या मराठी भाषेचे अस्तित्व धोक्यात आले आहे. कित्येक कुटुंबांत तर माणसे आपापसांत हिंदीतून बोलतात. ही परिस्थिती मराठी संस्कृती आणि पर्यायाने मराठी साहित्याच्या निर्मितीला अतिशय घातक आहे.

याविषयी प्रत्येक मराठी माणसाने आत्मचिंतन करायला हवे. आपल्या कुटुंबातील भावी पिढीला निदान प्राथमिक शिक्षणतरी मराठी माध्यमातून मिळण्याची सोय शासनाने करून देण्याचा आग्रह धरावा लागेल. भारतीय घटनेने हा अधिकार अल्पसंख्याक भाषिक लोकांना दिलेला आहे. तो पदरात पाडून घेतल्यावर पुढील शालेय शिक्षणातही मराठी माध्यमाची सोय होण्यासाठी प्रयत्न करणे ओघानेच आले. त्याचा परिणाम म्हणून भविष्यात महाविद्यालयांतूनही मराठी भाषा आणि साहित्याच्या अध्ययन-अध्यापनाला वाव मिळेल. आज पदव्युत्तर परीक्षेसाठी मराठी साहित्य विषय घेऊन शिक्षणाची सोय फक्त इंदूर, उज्जैन, जबलपूर व सागर या विद्यापीठांतून आहे. पण मराठी विषयासाठी विद्यार्थी मिळविण्यासाठी किती प्रयास पडतात, ते तिथले प्रथितयश प्राध्यापक सांगतात.

मराठीच्या या उतरणीला आम्हीच जबाबदार आहोत. दुसरे कोणीही नाही. अल्पसंख्याक भाषासमुदाय जेव्हा वेगळ्या बहुसंख्याक भाषीय प्रदेशात जातो, तेव्हा हे घडून येण्याची शक्यता जास्त असते. अशा वेळी सुरुवातीलाच अल्पसंख्याकांनी आपल्या भाषेच्या अस्तित्वासाठी आग्रह धरला, तर ही भयावह आपत्ती टाळता येते. माणूस जेव्हा दुसऱ्या भाषिक संस्कृतीत प्रवेश करतो, तेव्हा त्याची संस्कृती सावलीसारखी त्याच्या मागे येते. कालांतराने जेव्हा परभाषेचा सूर्य हळूहळू माध्यान्ही सरकू लागतो, तेव्हा त्याच्या संस्कृतीची सावली उत्तरोत्तर लहान होत जाते. आणि परभाषेचा हा सूर्य जेव्हा माध्यान्ही डोक्यावर येतो, तेव्हा त्याच्या संस्कृतीची सावली सर्वांत लहान होते. ती त्याच्या पायाखाली येते आणि तोच तिला पायदळी तुडवून टाकतो.

अशी अस्तित्वहीन अवस्था निर्माण होण्यापूर्वीच जागृत व्हायला हवे. त्यासाठी मराठी माणसांचा मराठीतून होणारा संभाषणव्यापार वाढला पाहिजे. घरात व बाहेर मराठी माणसाशी मराठीतून बोलण्याचा व समोरच्या मराठी व्यक्तीला मराठीतूनच बोलण्याचा आग्रह धरला पाहिजे. घरात मराठी भाषा आणि संस्कृतीचे वातावरण जपायला हवे. पुढच्या पिढीला मराठी वाचण्याचा सराव राहावा, यासाठी घरात संस्कारोपयोगी व चांगल्या साहित्याची पुस्तके हवीत. आज दूरदर्शनवर मराठी वाहिन्या सहज उपलब्ध असतात. त्यातून मराठी कार्यक्रमांचा, नाटकांचा, मालिकांचा व इतर सांस्कृतिक वातावरणाचा परिचय होतो. घरात व कुटुंबात मराठीला पोषक वातावरण तयार करता येईल. शहरात वा गावात मराठीचे वाचनालय हवे. अशा कितीतरी उपलब्धी मराठी भाषेला जिवंत ठेवण्यासाठी उपयोगी पडतील.

बृहन्महाराष्ट्रात आणि विशेषकरून मध्यप्रदेशात महाराष्ट्र मंडळांनी मराठी संस्कृतीच्या जतन व संवर्धनाचे कार्य नेटाने चालविले आहे. अनेक सांस्कृतिक संस्था आपापल्या परीने झटत आहेत. इंदूरची महाराष्ट्र साहित्य सभा व भोपाळचे मध्यप्रदेश मराठी साहित्य संघ, यांनी मराठी साहित्याच्या संदर्भात ऐतिहासिक मोलाचे कार्य केले. अलीकडे मध्यप्रदेश शासनाने मराठी ॲकेडमीची स्थापना करून मराठीच्या भाषिक आणि सांस्कृतिक विकासाला चालना दिली. मध्यप्रदेशात इंदूर, भोपाळ, उज्जैन, देवास, धार, जबलपूर, बऱ्हाणपूर, ग्वाल्हेर या ठिकाणीही मराठी संस्था असून आपापल्या परीने मराठी संस्कृतीची सेवा करीत आहेत. मध्यप्रदेश शासनातर्फे उत्कृष्ट मराठी ग्रंथाला भा. रा. तांबे पुरस्कार देण्यात येतो. हे सगळे चित्र आशादायी वाटते याचे कारण आज या संस्थांतून कार्य करणारी मंडळी चाळिशी-पन्नाशीच्या पुढची आहेत. काही नोकरी व व्यवसाया-निमित्ताने महाराष्ट्रातून येऊन स्थायिक झालेली आहेत. या सर्वांचे कुठल्या ना कुठल्या स्तरावर मराठीतून शिक्षण झालेले आहे. खरी समस्या भविष्यात निर्माण होण्याची शक्यता वाटते. पुढच्या पिढीत, मराठी शिक्षणाचा अभाव असलेली मंडळी, मराठीचा हा जुना सांस्कृतिक वारसा सांभाळायला पुढे येतील का? मुळात मराठीचा अभ्यास नसेल, तर मराठीतून साहित्याची निर्मिती किती प्रमाणात व कशी होणार? हा मराठी साहित्याचा प्रवाह असाच जोमाने खळाळत राहणार की रोडावणार?

एके काळी मध्यप्रदेशात हौशी कलावंतांचे नाट्यप्रयोग मोठ्या संख्येने गणेशोत्सवात व इतर मराठी कार्यक्रमांत आवर्जून आयोजित व्हायचे. ग्वाल्हेरला शरद व्याख्यानमाला, इंदूरचा शारदोत्सव यांत भारतातील मान्यवर साहित्यिकांची, पुढाऱ्यांची व कलाकारांची भाषणे होत. त्यांचे भविष्य रोडावणाऱ्या मराठी रसिक श्रोत्यांच्या संख्येवरून आज स्पष्ट होत आहे. वेळीच या बाबतीत पाऊल उचलले नाही, तर मराठीला अज्ञातवासात जावे लागेल, हे सांगायला कोणा भविष्यवेत्त्याची गरज नाही. मराठी संस्थेतून होणाऱ्या कार्यक्रमांनी मराठीच्या वाढीला थोडाफार हातभार लागत असला, तरी तिचे खरे पालन-पोषण घराघरांतून व्हायला हवे. तिचे हक्काचे घर मराठी कुटुंब आहे. तिचा सांभाळ घरातल्या अपत्यासारखा झाला, तरच ती आनंदाने नांदेल. नाहीतर ती उघड्यावर पडेल, तिथेच संपेल.

अडीचशे वर्षांहून अधिक काळापर्यंत इथल्या जमिनीतच मराठी व मराठी माणसाच्या जगण्याला अर्थ आला. इथल्या मातीला मराठी सुगंध आपण सर्वांनी दिला. तिचा हा सुगंध यापुढेही दरवळत राहावा म्हणून तो जपायला हवा. पण आपल्या धडपडीतून; संघर्षातून नव्हे! संघर्षात प्रसंगी आक्रमकता येते. पण, धडपडीत प्रयत्नांचा प्रामाणिकपणा व अहिंसा असते. इथल्याच मातीत तुमचे पाय रोवलेले आहेत. तेव्हा या मातीला आणि मायबोलीला विसरू नका.

भाषा आणि संस्कृती या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. भाषा टिकली तरच मराठी संस्कृती टिकणार. अन्यथा नाही. ज्या भाषेने, संस्कृतीने, परंपरेने तुमची मराठी माणूस म्हणून ओळख निर्माण करून दिली, तिला नाकारून एक अस्तित्वहीन आयुष्य जगायचं का? असं झालं तर मराठी माणूस त्यांनीच निर्माण केलेल्या एका भाषाविहीन समाजाच्या–Languageless Society–च्या दिशेने वाटचाल करू लागेल, आपली ओळख विसरून जगायचं, की ओळख निर्माण करून जगायचं, हे तुम्हा-आम्हा सर्वांना ठरवायचं आहे.

☆☆☆

# महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे योगदान

श्री. अशोक चौसाळकर

काही वर्षांपूर्वी महाराष्ट्रातील ज्येष्ठ विचारवंत प्रा.गं. बा. सरदार यांनी 'महाराष्ट्रातील उपेक्षित मानकरी' हे पुस्तक लिहिले. त्यांत त्यांनी कर्मवीर विठ्ठलराव शिंदे यांचा समावेश केला नव्हता. महाराष्ट्राने ज्या थोर माणसांची उपेक्षा केली, त्या महनीय व्यक्तींमध्ये सर्वांत जास्त उपेक्षा कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांची करण्यात आली.

आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासामध्ये कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी अत्यंत मोलाचे कार्य केले आहे. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत इतके मूलभूत आणि मूलगामी योगदान देणारा दुसरा महापुरुष अपवादानेच मिळेल.कर्मवीर शिंदे यांचे महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी १९०६ साली 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन' काढून अस्पृश्यतेची जी हीन अशी भारतीय समाजातील रूढी होती, तिच्याविरुद्ध चळवळ उभी केली. भारतामध्ये अशा प्रकारची चळवळ उभी करून आपलं आणि आपल्या कुटुंबाचं संपूर्ण आयुष्य वेचणारा दुसरा पुरुष सापडणे अवघड आहे. केवळ अस्पृश्यतानिवारणासाठीच महर्षींनी कार्य केले नाही, तर अस्पृश्यतेचा प्रश्न समजावून सांगण्यासाठी, त्याचा छडा लावण्यासाठी त्यांनी मूलभूत संशोधनकार्यही केले. त्यातून त्यांनी 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. अस्पृश्यतेच्या संदर्भात शास्त्रीय पद्धतीने लिहिलेला तो एक पहिला ग्रंथ होता. त्यात सिद्धांत आणि व्यवहार या दोहोंमध्ये योग्य ती सांगड घालण्याचे काम महर्षी शिंदे यांनी केले.

महाराष्ट्रामध्ये प्रार्थना समाज व ब्राह्मो समाजाच्या विचारप्रसाराचे कार्य महर्षी शिंदे यांनी सातत्याने केले. त्यासाठी हजारो पुस्तके समाजामध्ये त्यांनी वाटली. हजारो व्याख्याने दिली, प्रार्थना चालविल्या. प्रार्थना समाज व ब्राह्मो समाजाचे कार्य भारतीय समाजापर्यंत पोचविण्याच्या कामासाठी महाराष्ट्रामध्ये दुसऱ्या कोणत्याही माणसाने महर्षी शिंदे यांनी जेवढे कष्ट घेतले, तेवढे घेतले नसतील. बिहार आणि उत्तर प्रदेशात हे कार्य करताना कसं उपाशी रहावं लागलं, कष्ट घ्यावे लागले, याचे विवेचन त्यांनी त्यांच्या आत्मचरित्रात केले आहे. ब्राह्मो व आर्य समाजाचा अभ्यास करत असतानाच त्यांनी सत्यशोधक समाजाचाही अभ्यास केला. त्यांनी म.फुले यांचे कार्य समाजाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. त्याबाबत महर्षींचे एक वाक्य महत्त्वाचे आहे, ते म्हणतात, गेल्या ७०-८० वर्षांचा महाराष्ट्राचा इतिहास 'महात्मा फुले' या दोन अक्षरांमध्ये समाविष्ट झाला आहे. फुल्यांच्या कार्याचे व्यापक विवेचन करून सत्यशोधक चळवळीला नवे रूप कसे दिले पाहिजे. याचे त्यांनी सखोल विवेचन केले.

**धर्मचिकित्सा :**

धर्मसुधारणेच्या चळवळीमध्ये तुलनात्मक धर्मसंकल्पनेचा त्यांनी अभ्यास केला. इंग्लंडमध्ये जाऊन त्याचा कोर्स ते शिकून आले आणि त्याद्वारे त्यांनी धर्माची खोल अशी चिकित्सा केली. धर्म म्हणजे काय? मानवी जीवनात धर्माचे महत्त्व कशासाठी? आणि शेवटी मानवी जीवनाची चिकित्सा म्हणजे मानवी धर्माची चिकित्सा असते. धर्मसंकल्पनेची खोलवर चिकित्सा शिंदे यांनी केली. त्याबाबत त्यांनी असे म्हटले, की खरा धर्म धर्मग्रंथांमध्ये नाही, प्रेषितांनी सांगितलेल्या धर्मवचनांमध्ये नाही, देवळं, मशिदी किंवा चर्चमध्ये नाही, आचारामध्ये नाही. आजच्या संदर्भात धर्माचे जे स्वरूप आहे, ते उन्नत असं मानवी जीवन विकसित करणे हे आहे. त्यामध्ये प्रेम महत्त्वाचे आहे. धर्माचे स्वरूप समजून घ्यावयाचे झाल्यास प्रेमभावना निर्माण करा, करुणेची भावना निर्माण करा. बुद्धीच्या साह्याने प्रत्येक गोष्टीचा अभ्यास करा, आणि मानवी जीवनाचा नव्या पद्धतीने विकास करा. आता सत्याचा शोध आधुनिक विज्ञानाच्या व सामाजिक शास्त्रांच्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासातून होतो; तो अध्यात्माच्या माध्यमातून होत नाही. त्यातूनच मानवी










जीवनाचा विकास होणार आहे.

नागरिकत्वाची कर्तव्ये चांगल्या प्रकारे करणे, मनुष्य म्हणून त्याच्या अंगी मनुष्याच्या गुणांचे संगोपन करणे, प्रेम-करुणा-विवेक हे विचार माणसाच्या अंगी बाणवणे या गोष्टी महर्षींच्या मते, खऱ्या अर्थाने आजच्या धर्मभावनेची वैशिष्ट्ये आहेत. त्या दृष्टीने आपण धर्मभावना जागृत केली पाहिजे. लॉर्ड टेनिसन या इंग्रजी कवीच्या संदर्भात महर्षी म्हणतात, मानवी जीवनात दु:खं होतात. मानवापुढे अनेक दु:खाचे प्रसंग असतात. टेनिसनच्या एका जिवलग मित्राच्या निधनाने टेनिसन दु:खाने वेडापिसा झाला. त्यातून कसे बाहेर पडावे, हे त्याला कळेना. त्या वेळी त्याच्या मनामध्ये अशी धर्मभावना रुजली, की समाजातील आपल्या जवळच्या माणसावर जे प्रेम केले आहे, ते प्रेम संपूर्ण समाजावर, संपूर्ण मानवजातीवर करा.

मित्राच्या मृत्यूमुळे झालेले व्यक्तिगत दु:ख हे मित्राबद्दल असलेल्या प्रेमातून निर्माण झाले आहे. हे प्रेम सर्व जगासाठी द्या. धर्माचा उन्नत असा अविष्कार म. फुले व रानडे यांच्यानंतर महर्षी शिंदे यांनी त्यांच्या धर्मविषयक विचारांमध्ये मांडलेला दिसतो. सार्वजनिक सत्यधर्मामध्ये, ब्राह्मो व प्रार्थना समाजांमध्ये जो धर्मविषयक विचार मांडला आहे, तो विचार नव्या उन्नत स्वरूपामध्ये महर्षी शिंदे यांनी लोकांसमोर मांडला. माणसाला जास्त चांगला, जास्त उन्नत माणूस बनवणे हे त्यांच्या धर्मविचाराचे सार होते.

**भागवतधर्माची मीमांसा :**

महर्षी शिंदे यांचे आणखी एक महत्त्वाचे योगदान म्हणजे महाराष्ट्रातील जो भागवतधर्म आहे, ज्या धर्माचा विकास पंढरपूरमध्ये झाला, त्या धर्माच्या स्वरूपाचे उत्कृष्ट असे विवेचन महर्षींनी त्यांच्या विविध व्याख्यानांमधून केले आहे. महाराष्ट्र आणि भारतातील भागवतधर्म यांचा विकास कसा झाला? त्यांच्या मते भारतीय संस्कृती ही केवळ आर्यांची संस्कृती नाही, ती केवळ वेद मानणाऱ्या वैदिकांची संस्कृती नाही; तर आर्यपूर्व लोकांचीही संस्कृती आहे; ती येथील जुन्या आदिवासी लोकांची, आदिम जनजातींचीही संस्कृती आहे. भारतातील देवदेवता व येथील भागवत संप्रदाय या प्राचीन परंपरेचा अविभाज्य भाग आहेत. शिवभागवत, विष्णू भागवत व दुर्गाभागवत या सर्व परंपरा भारतातील आदिवासी जातींच्या देवांच्या परंपरा आहेत. भारतीय संस्कृतीचे हे जे महावस्त्र आहे, ते भारतातील हजारो जातिजमाती, कोठ्या या सगळ्यांच्या संस्कृतिसमन्वयातून विणलेले महावस्त्र आहे. त्यावर भारतातील एका मोठ्या विशिष्ट जातीने किंवा विशिष्ट वर्णाने वेदांचा आधार घेऊन मक्तेदारी सांगण्याचा प्रयत्न करू नये, असे महर्षी शिंदेंचे मत होते. कारण भारतातील भागवतधर्माचा उद्देश मानवाची उन्नती करणे हा होता. जातीय अहंकार वाढविणे, वर्णद्वेषाचा पुरस्कार करणे हा भागवतधर्माचा उद्देश नव्हता, तर समाजात समता आणि बंधुभावाची प्रस्तावना करणे हा त्याचा उद्देश होता. महाराष्ट्रात संत नामदेव, संत ज्ञानेश्वर, संत एकनाथ आणि संत तुकाराम यांनी याबाबत अतिशय चांगली मांडणी केली होती. संत तुकाराम यांच्याबाबत व्यापक विवेचन महर्षींनी केले आहे. तुकारामांच्या अभंगांना घेऊन ते प्रार्थना चालवत असत. महर्षींनी तुकारामांना 'सत्याग्रही वीर' म्हणून संबोधले, ज्याने सत्याग्रहाची वृत्ती अंगी बाळगून व परिस्थितीशी संघर्ष करून थोर धर्मभावनेचा विकास केला. त्यांनी भागवतधर्माबाबत जे विवेचन केले, त्याकडे अभ्यासकांनी लक्ष देणे आवश्यक होते, ते दिले नाही. त्यामुळे महर्षींची व्याख्याने आजही सहजपणे उपलब्ध होऊ शकत नाहीत. श्री.ग.ल.ठोकळ यांनी शिंदेलेखसंग्रह प्रकाशित केला आहे. त्यामध्ये त्यांची मौलिक व्याख्याने आहेत. त्यांचे पुनर्प्रकाशन होणे आवश्यक आहे.

या विषयावर डी.डी.कोसंबी यांनी भक्तिचळवळीच्या संदर्भात भागवतधर्माची जी मांडणी केली आहे, त्या पद्धतीची मांडणी वि.रा.शिंदे यांनी ७०-८० वर्षांपूर्वी केली होती. वरील इतिहासकारांचे निष्कर्ष वि.रा.शिंदे यांच्या निष्कर्षांपेक्षा वेगळे नाहीत. मोहेंजोदडो व हडप्पा येथील अवशेषांचा नुकताच शोध लागलेला तो काळ होता. तरीही स्वत:च्या अंत:प्रेरणेच्या जोरावर शिंदे यांनी भागवतधर्माच्या परंपरेची डोळस अशी मांडणी केली.

**मूलगामी संशोधक :**

महर्षी शिंदे यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक महत्त्वाचा पैलू म्हणजे ते एक ज्येष्ठ संशोधक व

इतिहासकारही होते. इतिहासाचे सखोल वाचन त्यांनी केले होते. छ.शिवाजींच्या कार्याचे थोडक्यात पण अगदी चांगले विवेचन त्यांनी केले आहे. त्यामुळे राजर्षी शाहूंनी महर्षींना छ.शिवाजीमहाराजांचे चरित्र लिहिण्याची विनंती केली होती. परंतु कार्यबाहुल्यामुळे त्यांच्या हातून हे कार्य होऊ शकले नाही. महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास कसा करावा, याबाबतचे उत्तम विवेचन शिंदे यांनी केले आहे. थोर इतिहासाचार्य वि.का.राजवाडे यांनी 'राधामाधव विलास चंपू' नावाचा ग्रंथ प्रकाशित केला. तो ग्रंथ म्हणजे छ.शहाजीमहाराजांचे चरित्र होय. या ग्रंथाला त्यांनी २०० पानांची प्रदीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत राजवाड्यांनी जे जातिवादी विवेचन करून चुकीचे निष्कर्ष काढले होते, त्यांचे कठोर परीक्षण महर्षी शिंदे यांनी केले आहे. एखाद्या ग्रंथाचे परीक्षण कसे करावे, चुका निदर्शनास आणताना संयम कसा दाखवावा, याचे ते उत्तम उदाहरण आहे. शिवाजींच्या उदयाची, त्यांच्या स्वराज्याच्या स्वरूपाची थोडक्यात मांडणी महर्षींनी केली आहे. ती मांडणी आजच्या संदर्भात महत्त्वाची आहे. याचे कारण सांगताना महर्षी शिंदे विचारतात, छ.शिवबा महाराष्ट्रातच का निर्माण झाला? इतरत्र का निर्माण झाला नाही? त्यासाठी महर्षींनी मराठ्यांची पूर्वपीठिका हा लेख लिहिला आहे. महाराष्ट्रात मराठ्यांची वसाहत कधी निर्माण झाली, मराठे कोण आहेत? मराठ्यांनी महाराष्ट्रात कशा प्रकारे बालराष्ट्रे निर्माण केली होती, याचे विवेचन त्यांनी केले आहे. समाजशास्त्रीय, मानववंशशास्त्रीय पद्धतीने त्यांनी विवेचन केले. महाराष्ट्रातील मराठा जातींची वसाहत कशी झाली? कधी झाली? त्या जातीची वैशिष्ट्ये काय आहेत? मराठ्यांमध्ये व त्यांच्या संगतीमुळे इतर जातींमध्ये लोकशाही वृत्ती मुळातच कशामुळे निर्माण झाली? महाराष्ट्रातील ग्रामसंस्था, जातिसंस्था यासुद्धा कशा प्रकारे लोकशाही व्यवस्थेने नियंत्रित केल्या आहेत, याचे उत्तम विवेचन त्यांनी केले आहे. महर्षींच्या मते, स्वराज्य हे महाराष्ट्राच्या प्रकृतीमध्येच भिनलेले आहे. ती मराठ्यांची प्रकृती असल्यामुळे छ.शहाजींनी स्वराज्याचा संकल्प केला, तो संकल्प शिवाजींनी पूर्णत्वास नेला. महर्षींच्या मते, छ.शिवाजींच्या स्वराज्याची संकल्पना त्यांच्या वडिलांची संकल्पना होती. 'गोब्राह्मण प्रतिपालक' हे छ.शिवाजींच्या स्वराज्याचे वर्णन चुकीचे असून प्रत्यक्षात ते शेतकरीवर्गाचे स्वराज्य होते. छ.शिवाजींचे स्वराज्य लोकशाही विचारांचा आत्मा समोर ठेवून स्थापन झालेले होते. आणि त्यामध्ये महाराष्ट्रातील लोकांमध्ये मुरलेल्या स्वराज्याच्या भावनेचा उत्तम असा आविष्कार झाला होता. छ.शिवाजी आणि म.गांधी या दोन महापुरुषांच्या कार्यांची तुलनासुद्धा महर्षींनी केली होती. एकाचा मार्ग हिंसेचा तर दुसऱ्याचा मार्ग अहिंसेचा आहे. दोघेही इंद्रियांवर नियंत्रण ठेवणारे थोर असे महापुरुष आहेत. एकाला स्वराज्य स्थापन करायचे होते, तर दुसऱ्याला स्वाराज्य स्थापन करायचे होते, स्वराज्य हे एक प्रकारचे आदर्श राज्य असते, ज्यात दंडशक्तीचा ऱ्हास होतो. स्वराज्य ही शिंदे यांची कल्पना होती.

शिंदेंची बुद्धी अत्यंत तीक्ष्ण असल्यामुळे व तुलनात्मक दृष्टीने सगळीकडे ते पाहत असल्यामुळे ते नेमका नवा विचार आपल्याला सांगतात. महाराष्ट्रातील वसाहत, मराठा जातीचा उदय यांबाबत त्यांनी केलेली मांडणी आजच्या काळात पूर्णतः मान्य होणारी नसली, तरी त्यातील काही सूत्रे महत्त्वाची आहेत.

**अस्पृश्यतानिर्मूलन :**

महर्षींनी सर्वांत मोलाचे जे कार्य केले, ते अस्पृश्यता निर्मूलनाचे कार्य होय. त्यांनी अस्पृश्यतेचा प्रश्न धसास लावला. त्यासाठी त्यांनी ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज आणि काँग्रेस पुढाऱ्यांशी संघर्ष केला. या गोष्टीसाठी त्यांना ब्राह्मो समाजातून बाहेर पडावे लागले. शिंदे यांनी धर्मप्रचाराचे कार्य करावे, असे प्रार्थना समाजाचे म्हणणे होते. शिंदेंच्या मते, अस्पृश्यतानिर्मूलन हा धर्मप्रसाराचाच एक अविभाज्य भाग आहे. अस्पृश्यतानिर्मूलनापेक्षा अन्य कुठलेही कार्य धर्मप्रचारात महत्त्वाचे नाही. त्यावरून हे मतभेद झाले होते. केरळमधील वैकम सत्याग्रहात भाग घेतल्यामुळे ब्राह्मो समाजाशी त्यांचे मतभेद झाले. लोकमान्य टिळकांशी त्यांनी त्यासाठी संघर्ष केला व सांगितले अस्पृश्यतानिवारण्याच्या कार्यात तुम्ही पाठिंबा द्या. टिळकांनी पाठिंबा दिला, पण पुढे त्यासंबंधीच्या निवेदनावर सही करताना टिळक चाचरू लागले, तेव्हा महर्षी शिंदे टिळकांना म्हणाले की, "याबद्दल इतिहास तुम्हाला क्षमा

करणार नाही. तुम्ही बोलता ते करून दाखवायचे असेल तर सही करा." म.गांधींना ते म्हणाले की "तुमच्या दृष्टीने अस्पृश्यता निवारण्याचा प्रश्न दुय्यम आहे. अग्रक्रमाचा प्रश्न स्वराज्य मिळविणे हा आहे. माझ्या दृष्टीने अस्पृश्यतानिवारण्याचा प्रश्न स्वराज्य प्राप्तीतील महत्त्वाचा भाग आहे. तोच अग्रक्रम आहे." अशा प्रकारे सातत्याने जगाच्या वेशीवर १/६ भारतीय लोकांचे जे दुःख आहे ते सांगण्याचा, ते दुःख दूर करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. त्यांनी डिप्रेस्ड क्लास मिशनचे काम केले. मात्र मतभेद झाल्यानंतर त्यांना ते काम सोडावे लागले. एकदा विमनस्क अवस्थेत खोलीत बसले असताना आपणच स्थापन केलेल्या संस्थेतून बाहेर जाण्याचे दुःख त्यांना झाले. जी अवस्था ज्ञानेश्वरांची झाली, तीच अवस्था शिंदे यांची झाली. ज्या वेळी ताटीचे अभंग मुक्ताबाईंनी म्हटले, त्या वेळी त्या म्हणाल्या, 'विश्वरागे झाले वन्ही संत सुखया व्हावे पाणी' संताला, सज्जन माणसास, थोर पुरुषाला समाजावर राग करण्याचा अधिकार नाही. जसे मुक्ताबाईने ज्ञानेश्वरांना समजावून सांगितले, तसेच महर्षींच्या बहीण जनाक्का यांनी महर्षींना समजावून सांगितले. त्या म्हणाल्या, "विमनस्क अवस्थेत न बसता आपल्याला करावयाचे काम केले पाहिजे. आज नाहीतर उद्या त्या कामाची पावती मिळेल किंवा मिळणार नाही. आपण करत असलेले काम कर्तव्यभावनेतून करत आहोत, त्यामुळे यशापयशाचा मुद्दा येथे महत्त्वाचा नाही."

**केशवचंद्र सेन आणि फुल्यांची तुलना :**

वि.रा.शिंदे यांचा बंगालमधील नवविधान ब्राह्मो समाजाचे थोर पुढारी केशवचंद्र सेन आणि फुले यांच्यात तुलना करणारा हा लेख आहे. त्या लेखाच्या सुरुवातीस शिंदे लिहितात, हे दोघे कोणत्याही जातीमध्ये जन्माला आले असते तरीही त्यांनी हेच काम केले असते, जे त्यांनी केले आहे. केशवचंद्र रसिक होता. लक्ष्मी आणि सरस्वती त्याच्या पायाशी लोळत होती. गरीब बिचारा जोतीबा, सह्याद्रीच्या डोंगरामध्ये जन्मलेला की ज्याच्याजवळ लक्ष्मी-सरस्वती फारशी नव्हती; परंतु लक्ष्मी-सरस्वतीच्या बेड्या त्याच्या पायांत नव्हत्या. म्हणून जोतीबांनी मुक्तपणे जे कार्य करायचे होते ते केले. सेन यांना देवेंद्रनाथ टागोर, द्वारकानाथ टागोर आणि मुख्यतः राजा राममोहन रॉय यांची परंपरा होती, ज्या परंपरेच्या जोरावर त्यांनी नवविधान ब्राह्मो समाजाची रचना केली. जोतीबाला अशा प्रकारची कोणतीही पार्श्वभूमी नव्हती. केवळ अंतःप्रेरणेच्या जोरावर जोतीबांनी नवा विचार मांडला. जोतीबांनी कडक शब्दांत समाजावर कोरडे ओढले. केशवचंद्र हा रसिक होता. कला, साहित्य, संस्कृती, संगीत आदी क्षेत्रांत तो तज्ज्ञ होता. जोतीबा सह्याद्रीच्या डोंगरात जन्माला आलेले रानफळ होते. की जे अधिक औषधी होते. या रानफळाचे औषध घेतल्याशिवाय मराठी समाजाचा विकास होणार नव्हता. ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज व सत्यशोधक समाज यांच्यात मेळ स्थापन होऊ शकला नाही. पहिल्या दोन समाजांची तत्त्वे सत्यशोधक समाजापेक्षा फार वेगळी नाहीत. पण हा मेळ का स्थापन होऊ शकला नाही, हा प्रमुख मुद्दा महर्षी उपस्थित करतात. त्यांच्या मते, प्रार्थना समाजातल्या उच्च वर्णीय, उच्च वर्गीय, उच्च शिक्षित अशा लोकांना स्वतःच्या वैयक्तिक कल्याणासाठी, वैयक्तिक सुधारणेसाठी नवी धर्मसंकल्पना हवी होती. परंतु त्याच वेळी या देशातील शेकडा ९० टक्के बहुजन समाजाला कोणत्या दुःखामागे जीवन जगावे लागत आहे? त्याच्या धर्मभावनेचा, त्याच्या विकासाचा, त्याच्या पोटापाण्याचा प्रश्न काय आहे?, याची जाणीव त्यांना नव्हती. म्हणून आमच्या सुशिक्षितांना खेड्यात राहणाऱ्या शेकडा ९० टक्के लोकांच्या हृदयामध्ये काय चाललेलं आहे, कोणत्या स्वरूपाचा क्षोभ त्यांच्या हृदयामध्ये उसळतो आहे, याची जाणीव नव्हती. ते म्हणतात, महाराष्ट्र आणि भारताचे दुर्दैव असे, की ही जाणीव नसल्यामुळे हे दोघे एकत्र येऊ शकले नाहीत. त्यामुळे महाराष्ट्रामध्ये परिवर्तनाचे काम रेंगाळले.

१९२०-२२ मधला हा लेख आहे. जोपर्यंत देशातील बहुजन समाजाची दुःखं हा समाज लक्षात घेणार नाही, त्याच्याशी जुळवून घेणार नाही, तोपर्यंत खऱ्या अर्थाने नवसमाजनिर्मिती भारतात आणि महाराष्ट्रात निर्माण होणार नाही, हे विदारक सत्य शिंदेंनी सांगितले, जोतीरावाचा जो सत्यधर्माचा मार्ग आहे, तो अंगीकारल्याशिवाय तुम्हाला पुढे जाता येणार नाही. म्हणून 'सत्याचा पालनवाला तो धन्य जोतिबा झाला', हा पोवाडा महर्षींनी जोतीबावर लिहिला. महाराष्ट्राचा १०० वर्षांचा इतिहास महात्मा

फुले या नावात सामावला आहे, असे महर्षी म्हणतात. महर्षी शिंदे यांना फुल्यांच्या भूमिकेबाबत काही प्रश्न होते. त्यांच्या विचारांबाबत मतभेद होते. परंतु तुकारामाच्या परंपरेतील हा 'सत्याग्रही वीर' आहे, याची त्यांना जाणीव होती.

**राजकीय सुधारणांचा पुरस्कार :**

महर्षींनी राजकारणामध्येही महत्त्वाची भूमिका बजावली. राजकारणामध्ये महर्षी शिंदे याची जहाल गटांशी जवळीक होती. धर्मविचाराचा विचार केला तर न्या.रानडे, भांडारकर यांच्या ते जवळचे होते आणि ब्राह्मो व प्रार्थना समाजाचे कार्य त्यांनी केले. परंतु या लोकांचा राजकीय दृष्टिकोन शिंदे यांना मान्य नव्हता. राजकीय सुधारणांच्या बाबतीत महर्षी हे लोकमान्यांच्या विचारांचे पुरस्कर्ते होते. दोन्ही परंपरा आत्मसात करून पुढे जाण्याचा त्यांचा प्रयत्न होता. हे त्यांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य होते. राजकीय चळवळ केली पाहिजे, माझे राजकारणाशी वावडं नाही, मी राजकारणात जाणार असे महर्षींनी म्हटले होते. त्यांचे राजकारण हे स्वराज्य व स्वातंत्र्याचे राजकारण होते. डिप्रेस्ड क्लास मिशनचे काम करीत असताना एकदा लोकमान्यांना त्यांनी विचारले की, 'मी राजकारणामध्ये येऊ का? तुमचा काय सल्ला आहे?' विठ्ठल रामजीसारखा कार्यकर्ता मिळाला असता तर टिळकांसारख्या राजकीय पुढाऱ्याला ते हवेच होते. परंतु टिळकांनी महर्षींना राजकारणात न येण्याचा सल्ला दिला. "तुम्ही सध्या जे काम करीत आहात, ते फार महत्त्वाचे आहे; आज तुम्ही हे काम सोडले, तर ते काम करायला दुसरा मनुष्य नाही. राजकारणाचं पुढे बघू!" असे टिळक म्हणाले.

**बहुजन पक्ष आणि बहुजनवाद :**

महाराष्ट्रामध्ये समाजसुधारणा आणि राष्ट्रीयतेची भावना या दोन्ही गोष्टी हातात हात घालून चालल्या पाहिजेत, असं महर्षींचं मत होतं. महर्षींचे सत्यशोधक समाज व ब्राह्मणेतर चळवळीशी जवळचे संबंध होते. १९१९ साली मॉंटेग्यू चेम्स्फोर्ड सुधारणा झाल्या. या सुधारणांप्रमाणे १९२० मध्ये विधान परिषदेतील काही जागा मराठी आणि तत्सम जातींना राखीव करण्यात आल्या आणि काही जागा सर्वसाधारण उमेदवारांसाठी होत्या. मराठा समाजासाठी राखीव असलेल्या विधानपरिषदेच्या जागेवर महर्षींनी उभे रहावे अशी विनंती केली गेली. परंतु महर्षींनी 'मी जातीच्या आधारावर त्या जागेवर उभा राहणार नाही; मी सर्वसाधारण मतदार संघातून उभा राहणार', अशी घोषणा केली. त्यांनी सर्वसाधारण मतदार संघातून निवडणूक लढविली; परंतु निवडणुकीत मोठे राजकारण झाल्यामुळे महर्षींना पराभव पतकारावा लागला. त्यानंतर पुढच्या काळात ते निवडणुकांच्या राजकारणात पडले नाहीत. १९२०च्या निवडणुकीच्या निमित्ताने महर्षींनी नवा जाहीरनामा काढला होता. त्यांनी बहुजन पक्ष स्थापन केला. त्याद्वारा महाराष्ट्राच्या राजकारणात बहुजनवादाची संकल्पना सर्वप्रथम महर्षींनी १९२० साली मांडली. यापूर्वी ही कल्पना कोणीही मांडलेली नव्हती. या पक्षाचा जाहीरनामा स्पष्ट करून त्यांनी एक नवा विचार दिला. हा बहुजनवादाचा विचार होता. भारतातला व महाराष्ट्रातला बहुजन कोण? महर्षींनी बहुजनाची जी व्याख्या केली ती जातीच्या आधारावर केले नाही. त्यांच्या बहुजन व्याख्येमध्ये जातीबरोबर वर्गही महत्त्वाचा मानला गेला होता. लिंगभावही महत्त्वाचा आहे. त्याप्रमाणे महाराष्ट्रातल्या सगळ्या स्त्रिया बहुजनांमध्ये येतात. कारण त्यांच्यावर सगळ्या प्रकारचा अन्याय झाला आहे. दडपून टाकलेले सगळे जे वर्ग आहेत, त्या ७ प्रकारच्या लोकांचा महर्षींनी बहुजन समाजामध्ये समावेश केला आहे. वर्ग आणि जाती या दोन्ही संकल्पनांचा निकष लावून त्यांनी बहुजनवादाची कल्पना मांडली. बहुजनवाद हा कोणालाही वगळणारा नाही. कोणत्याही समाजाला कोणत्याही अधिकारापासून वंचित करू नका, असे शिंदे यांचे म्हणणे होते. म्हणून ब्राह्मणेतरवाद, मराठेतरवाद अशा इतर वादांना त्यांनी विरोध केला. हा इतर वाद समाजामध्ये फूट पाडतो, लोकांना स्वार्थ शिकवितो, नेत्यांना संधिसाधू बनवतो, म्हणून हा इतरवाद नको, असे वि.रा.शिंदेंचे मत होते. त्याबाबत ब्राह्मणेतर चळवळीस त्यांनी मार्गदर्शन केले.

**कॉंग्रेसचा प्रचार :**

१९२० नंतर म.गांधींच्या राजकारणाच्या प्रवेशानंतर वि.रा.शिंदे यांचा राजकारणात प्रवेश झाला. १९३० च्या

काँग्रेसच्या चळवळीत त्यांनी स्वत: भाग घेतला. केशवराव जेध्यांबरोबर त्यांनी काँग्रेसचा प्रचारही केला. सत्याग्रहात भाग घेतला, तुरुंगवास भोगला. त्यांची प्रकृती ठीक नसायची. त्यामुळे त्या वेळचे मुंबई राज्याचे मंत्री ब्राह्मणेतर चळवळीतील एक थोर नेते ना.भास्करराव जाधव महर्षींना भेटायला आले. त्या वेळी सुटकेबाबत उभयतांमध्ये बोलणी झाली. मात्र महर्षींना ही सुटका नको होती. मी शासनाला काहीही (लेखी) Undertaking देणार नाही, सरकारची कोणतीही माफी मी स्वीकारणार नाही, असे त्यांनी सांगितले. त्यांच्या मते काँग्रेसचा प्रचार करताना पुढारी जी मराठी भाषा वापरतात, ती येथील बहुजन समाजाला कळत नाही. म्हणून लोकांच्या हृदयापर्यंत आपल्याला जाऊन भिडायचे असेल, तर सोपी मराठी भाषा बोलली पाहिजे. आपली आधुनिक प्रमाण भाषा लोकांसाठी 'बेंडबाजा' आहे. लोक ऐकतात आणि सोडून देतात; कारण त्यांना ती कळत नाही, हा एक मुद्दा शिंदे यांनी मांडला होता. १९३० सालचे शिंदे यांचे सर्वांत मोठे योगदान म्हणजे शेतकरी समुदायातून, बहुजन समाजातून आलेले जे सर्व पुढारी होते, त्या पुढाऱ्यांना राष्ट्रीय चळवळीमध्ये सामील करून घेण्यामध्ये त्यांनी मोलाची भूमिका बजावली. केशवराव जेधे, शंकरराव मोरे, आनंद स्वामी वगैरे जे ब्राह्मणेतर चळवळीतील महत्त्वाचे पुढारी होते, त्या पुढाऱ्यांना त्यांनी राष्ट्रीय चळवळीत सहभागी करून घेतले. आता बहुजन समाजाने काँग्रेसच्या बाहेर राहू नये. काँग्रेसची चळवळ ही सबंध देशाची चळवळ आहे आणि म.गांधींसारखा लोकोत्तर पुढारी काँग्रेसजवळ आहे, त्यामुळे काँग्रेसमध्ये या समाजाने सामील व्हावे असे त्यांचे मत होतं. १९२० च्या असहकार चळवळीला शहरी भागाप्रमाणे ग्रामीण भागाचा पाठिंबा नव्हता. मात्र १९३० च्या चळवळीत संबंध देशभर सर्वांत पुढे महाराष्ट्र होतात. सर्वाधिक सत्याग्रही महाराष्ट्रातील होते. त्यामध्ये ग्रामीण शेतकरीपुढारी आणि लोकांचा अधिक सहभाग होता. म्हणून महाराष्ट्राच्या सत्याग्रहींचे गांधीजी कौतुक करत आणि म्हणत, की महाराष्ट्र हे कार्यकर्त्यांचे मोहोळ आहे.

**शेतीविषयक प्रश्न :**

महर्षींच्या कार्याचा आणखी एक महत्त्वाचा पैलू म्हणजे, त्यांनी शेतकऱ्यांच्या अनेक परिषदांना मार्गदर्शन केलं. भोर संस्थान, वाळवा, चांदवाड आदी शेतकरी परिषदांमध्ये त्यांनी शेतकऱ्यांना शेतीविषयक प्रश्नांबाबत मार्गदर्शन केले. महाराष्ट्राचा खरा प्रश्न हा शेतकऱ्यांचा प्रश्न आहे, याबद्दलची मांडणी त्यांनी केली. अस्पृश्य शेतकऱ्यांची परिषद त्यांनी घेतली. त्या संदर्भात ३ मुद्दे त्यांनी मांडले. आजही गायरान जमिनीच्या संदर्भात चळवळ करणाऱ्या रिपब्लिकन नेत्यांनाही मार्गदर्शक ठरतील, असे मुद्दे महर्षींनी मांडले आहेत. शेतकरीवर्गामध्ये गट आहेत. १) महाराष्ट्रातील शेती देशातील इतर भागातील शेतीपेक्षा कमी उपजाऊ आहे. महाराष्ट्रात जमीन पाण्याखाली आणण्याची क्षमता कमी आहे. त्यामुळे महाराष्ट्रातील गावसमाजात जी एकी आहे, ती लक्षात घेऊन शेतीबद्दलचे जे प्रश्न आहेत ते सुटे सुटे सोडवून उपयोगाचे नाही. सामूहिक दृष्ट्या शेतकऱ्यांनी याबाबत उपाययोजना केली पाहिजे आणि गावसमाजाचे ऐक्य कायम ठेवले पाहिजे. त्यामध्ये जातीचा विचार महत्त्वाचा नाही. एकंदरीत सहकारी शेतीची कल्पना त्यांनी त्या काळी मांडली नव्हती. परंतु भारतीय समाजातील परस्पर-साहाय्याची परंपरेने चालत आलेली भावना गावसमाजात रुजली पाहिजे, असा महर्षींचा आग्रह होता. २) दुसरा जो शेतीविषयक प्रश्न होता, तो म्हणजे शेतमालाला किफायतशीर बाजारभाव कसा मिळवायचा हा. अनेक वर्षांपासून शेकाप व शेतकरी संघटनेने त्याबाबत लढे उभारूनही हा प्रश्न अद्याप सुटलेला नाही. आतातर शेतकऱ्यांच्या मोठ्या प्रमाणावर आत्महत्या होत आहेत. त्याबाबत महर्षींचे असे मत होते की, जोपर्यंत शेतमालांच्या बाजारपेठांवर शेतकऱ्यांचे वर्चस्व निर्माण होत नाही, तोपर्यंत शेतकऱ्यांपुढचा हा प्रश्न सुटणार नाही. आज शेतकऱ्यांची बाजारपेठ व्यापाऱ्यांच्या हातात आहे. या व्यापाऱ्यांना सरकारचा पाठिंबा आहे. त्यामुळे ते दोघे मिळून शेतकऱ्यांना लुबाडत आहेत. शेतकऱ्यांच्या मुक्तीच्या दृष्टीने शेतकऱ्यांनी खऱ्या अर्थाने बाजारपेठांवर नियंत्रण प्रस्थापित केले पाहिजे. त्या दृष्टीने शेतकऱ्यांनी चळवळी उभ्या केल्या पाहिजेत. संघटना स्थापन केल्या

पाहिजेत, अशी त्यांची भूमिका होती. ३) शेतकऱ्यांच्या सुधारणा सुट्यासुट्या होणार नाहीत. गाव आणि शेतकरी हे एकात्म आहेत. गावगाड्याची पुनर्रचना करा, गावगाड्याचं विघटन करू नका, असे ते सांगतात. गावगाड्याचे विघटन म्हणजे आमच्या शेतीचं विघटन आहे. आधुनिक भांडवलशाहीमुळे सुरू झालेल्या विकासाच्या प्रक्रियेमुळे आमचे गावगाडे नष्ट होत आहेत, ग्रामीण जीवनातील एकसंधता, एकात्मता नष्ट होत आहे. नव्या पद्धतीने गावगाड्याची पुनर्रचना कशी करता येईल, याबाबत त्यांनी विवेचन केले. त्यांच्या मते, स्वराज्याच्या चळवळीशी संबंध प्रस्थापित करून गावगाड्याची परिस्थिती सुधारू शकेल. त्यातूनच स्वराज्याची खरी अनुभूती शेतकऱ्यांना येईल.

शेतकऱ्यांनी कुणावरही विश्वास ठेवू नये, असे ते सांगतात. ते म्हणाले, "आज आपण काँग्रेस पक्षाच्या बरोबर आहोत. या पक्षात जोवर म.गांधी, पटेल, पं.नेहरू यांच्यासारखे पुढारी आहेत, तोपर्यंत आपण काँग्रेसवर विश्वास ठेवायला हरकत नाही. काँग्रेस हे पार्लमेंट आहे असे मानले जाते. पण कोणत्या पार्लमेंटवर आपण पूर्णपणे विसंबू शकतो? कारण प्रत्येक पार्लमेंट हे भांडवलदारी वर्गाचे पोषण करणारे आहे, असा जगाचा इतिहास आहे, म्हणून शेतकरीवर्गाने कोणाच्याही मांडीवर शांतपणे डोकं ठेवून झोपू नये." म्हणून नेहमी जागे रहा आणि सावध राहून आपले शेतकऱ्यांचे हितसंबंध जपा, असे ते सांगत. त्यामुळे "लोक मला (महर्षी). मी आता कम्युनिष्ट झालो, मी आता बोल्शेविक झालो, असे म्हणतात. मी बोल्शेविक झालो नाही, तर त्यांनी दिलेला नवा विचार मी अहिंसेच्या मार्गाने येथे रुजविण्याचा प्रयत्न करीत आहे," असे ते याबाबत म्हणाले. अशा प्रकारे या प्रश्नावर नवी दृष्टी त्यांनी दिली. १९३२ ते ४४ ही १२ वर्षे दुर्धर अशा कंपवात या रोगामुळे महर्षी आजारी पडले. नेमक्या त्याच काळात महर्षींनी केलेल्या कार्याची फळं काँग्रेस पक्षाला मिळण्याला सुरुवात झाली होती. पण आजारामुळे ते त्यात भाग घेऊ शकले नाहीत.

☆ ☆ ☆








# सरबजितसिंगच्या निमित्ताने

विश्वास दांडेकर

भारताच्या पंजाब प्रांतातील भारतीय नागरिक सरबजितसिंग याला पाकिस्तानातल्या लाहोरच्या तुरुंगात निर्घृण मारहाण झाली. उपचारादरम्यान पाकिस्तानमध्ये त्याचा मृत्यू झाला, मात्र त्याचे शव अंत्यसंस्कारासाठी भारतात पाठवण्यास पाकिस्तानने तयारी दर्शवली. त्याचा अंत्यविधी शासकीय इतमामात त्याच्या मूळ गावी पार पडला. या सर्व प्रकरणाबद्दल खेद वाटणे, राग येणे,क्षोम प्रकट होणे यात आश्चर्य नाही. त्याचे गाव सीमेलगत आहे. रात्रीच्या वेळी दारूच्या नशेत तो अजाणपणे सीमेपलीकडे गेला, पकडला गेला, असे कुटुंबीयांचे म्हणणे आहे. तो भारताचा हेर होता, दोन ठिकाणी बॉंबस्फोट घडवून आणण्यात त्याचा सहभाग होता, असे सरकारचे प्रतिपादन पाकिस्तानात खालच्या कोर्टाने मान्य केले, जे त्यांच्या सुप्रीम कोर्टापर्यंत मान्यच राहिले. त्याला फाशीची शिक्षा सुनावली होती, जी पाकिस्तानच्या राष्ट्राध्यक्षांनी कमी करून जन्मठेपेवर आणली.

सर्वसामान्य जनता, त्याचे कुटुंबीय-गणगोत यांच्या भावना आपण सहानुभूतीने समजून घेतल्या पाहिजेत. मात्र केंद्र व राज्यशासन यांची प्रतिक्रिया अनाकलनीय आहे. दूरचित्रवाहिन्यांना तर अशी संधी म्हणजे पर्वणीच ! लहानमोठ्या प्रसंगी बातम्या देताना यांतल्या बऱ्याच वाहिन्यांनी ताळतंत्र सोडून दिले आहे. आपणच आमंत्रित केलेल्या व्यक्तींना धड वाक्य पुरे न करू देणे, एक टोकाचे गृहीत ठरवून त्याच्या जरा विरोधी मत येऊ लागताच समोरच्याला जणू अमर्याद उलटतपासणीसाठी आपल्या हाती दिले आहे, असा भडिमार करणे अशा आवेशात या वाहिन्यांचे तथाकथित 'अँकर' वावरत असतात. असे न वागले तर आधीच काही शास्त्रीय आधार नसलेला 'टी आर पी' धोक्यात येईल, अशी काही मानसिकता आहे, का या मंडळींचे स्वतःच्या आवाजावर प्रमाणाबाहेर प्रेम आहे, का दोन्हीही? असा प्रश्न पडतो. असो. सरबजितसिंग खरोखरच भारतीय हेर होता का? या प्रश्नाचे उत्तर बहुधा कधीच मिळणार नाही, समजा मिळालेच, तर कमीतकमी तीस वर्षे वाट पाहायला हवी. शासनाने 'गुप्त' असे वर्गीकरण केलेली कागदपत्रे उघड करण्यासाठीची ती कायदेशीर मुदत आहे. अर्थात तीस वर्षांनी हे रहस्य उलगडलेल असे नाही. 'गुप्त' असा शिक्का मारलेली कागदपत्रे 'राष्ट्रीय सुरक्षा' या नावाखाली कायदेशीर मुदत संपल्यावरही उघड न करणे यात कमीअधिक प्रमाणात सर्व राष्ट्रे सहभागी असतातच. एकाधिकारशाही असलेल्या राष्ट्रांबद्दल प्रश्न विचारता येत नाहीच; पण लोकशाही शासनप्रणाली असलेल्या राष्ट्रांत शक्य तेवढी कमी माहिती उघड करणे अशी क्रमवारी लावली, तर या स्पर्धेत भारत निर्विवाद पहिल्या क्रमांकावर असेल.

प्रथम तो हेर नव्हता असे कुटुंबीयांच्या म्हणण्याप्रमाणे खरे धरले, तर 'हुतात्मा', 'राष्ट्राचा शूर सुपुत्र' असे वरिष्ठ नेत्यांचे उद्‌गार; पंजाब १ कोटी, केंद्र शासन २५ लाख अशी आर्थिक मदत; राजकीय सन्मानासह अंत्यसंस्कार; केंद्र शासनाच्या मंत्रिपरिषदेचे अंत्यसंस्कार-प्रसंगी प्रतिनिधित्व; सत्ताधारी पक्षाच्या क्रमांक दोनच्या नेत्यांची तिथे उपस्थिती या सर्वांचा काय अर्थ लावायचा? तो आमचा हेर होता, याला ही अप्रत्यक्ष मान्यता आहे, असा अर्थ निघत नाही का?

जर तो हेर असेल, तर प्रश्न आणखी गहिरा होतो. जर आपला हेर या खटाटोपात सहभागी असताना धरला वा मारला गेला, तर त्याच्या कुटुंबीयांना वाऱ्यावर सोडायचे नसते. मात्र त्यांना जी मदत द्यायची ती गाजावाजा न करता पोचवणे, असा मार्ग असतो. मध्ये काही काळ ज़ाऊ देत प्रकरण थंड झाले म्हणजे पुढची पावले उचलायची असतात. मधल्या काळात त्या कुटुंबीयांना आर्थिक आधार पुरवणे यासाठी खासगी ट्रस्ट, सामाजिक संस्था 'आयबी' (इंटलीजन्स ब्युरो) व 'रॉ' (रिसर्च अँड ॲनेलॅसिस विंग) या दोन संस्थांचे गुप्त निधी,

अशी बांधणी करावी लागते. ही तयारी नियोजित असावी लागते. एका रात्रीत करायचे हे काम नाही. त्यामुळे सरबजितसिंग हेर असो वा नसो, केंद्र शासनाचे वागणे अगम्य आहे.

माणसाच्या पृथ्वीवर वावरण्यात 'शेती' हा पहिला व्यवसाय हे सर्वमान्य आहे. आता इतिहासक्रमात क्रमांक दोनचा व्यवसाय कुठला? एक मत वेश्याव्यवसाय तर दुसरे हेरगिरी असे आहे. यावर खूप चर्चा झाली आहे. या चर्चेचा तपशील इथे आवश्यक नाही. इतके आपणास पुरे की हेर, हेरव्यवस्था अतिप्राचीन काळापासून वापरात आहेत. भारतापुरते बोलायचे तर ऋग्वेदात हेरांचे उल्लेख आहेत. महाभारतात तर स्पष्ट व विपुल उदाहरणे आहेत. इंग्रजी भाषेत 'इंटलीजन्स' आणि 'एस्पीनॉज' असे दोन शब्द चलनात आहेत, ज्यांचे अर्थ व व्याप्ती परस्परनिगडित असून निराळ्या आहेत. या दोन शब्दांना नेमके प्रतिशब्द मराठीत ज्ञात नाहीत. हेर, हेरगिरी, हेरव्यवस्था हे 'एस्पीनॉज'शी संबंध सांगतात. 'इंटलीजन्स' हा फार व्यापक व्यवहार आहे. या सर्व व्यवस्थेची विस्तृत मांडणी दूरच, ढोबळ आराखडाही या लहानशा लेखात अपेक्षित नाही. फार प्राचीन काळापासून राष्ट्रे स्वतःच्या प्रदेशात, शत्रू वा संभाव्य शत्रुराष्ट्रात, इतकेच नव्हे, तर मित्रराष्ट्रातही हेर 'पेरत' आली आहेत.

आधुनिक काळात या 'पेरणी'त दोन स्पष्ट पदर आहेत. परक्या राष्ट्रात आपले राजदूतावास असतात. तिथे नेमलेल्या अधिकाऱ्यांपैकी काही हेरगिरीसाठीच नेमलेले असतात. वरकरणी त्यांना इतर काम सोपवलेले असते. असे अधिकारी कुठले, ही माहिती एक-दोन वरिष्ठ अधिकाऱ्यांना फक्त असते. यांत मुख्य राजदूताचा समावेश असेलच, असे नाही. असे 'हेर' अधिकारी जर त्या राष्ट्राच्या पोलिसव्यवस्थेने 'पकडले', तर त्यांना राजनैतिक संरक्षण असते, तुरुंग पहावा लागत नाही. त्यांची मायदेशी रवानगी होते. दुसरा पदर जास्त धोकादायक. हेरगिरीतल्या लहान वा मोठ्या कामासाठी खाजगी व्यक्तीही गोवल्या जातात. या आपल्या राष्ट्रातून पाठवल्या जातात, तसेच त्या परक्या राष्ट्राच्या नागरिकही असू शकतात. जर यांची हेरगिरी उघड झाली, तर पकडले जाणे, मारहाण, तुरुंगवास, शारीरिक-मानसिक छळ, कुटुंबीयांना त्रास,वेदनामय मृत्यू.....काहीही घडू शकते. त्यामुळे हे हेर सतत एका ताणाखाली असतात.

आपल्या देशातून परक्या देशात हेर 'पेरणे' सोपे नसते. काही वेळा जवळपास अशक्य. दुसऱ्या महायुद्धापूर्वी जपानमध्ये परक्या राष्ट्राला हेर पेरणे अशक्यप्राय होते. वंश, भाषा, वैयक्तिक-सामाजिक चालीरीती, खाणेपिणे सर्वच परके. जपानी माणसाला हेर म्हणून नेमणे तेवढेच अवघड. याला कारणे दोन : १) जपानी माणूस कार्यालयीन जीवन व खासगी आयुष्य यांत सरमिसळ करत नसे. २) त्यांचा राजा (एम्परर-बादशाह) हा त्यांना प्रतिपरमेश्वर होता, आजही आहे. राष्ट्रनिष्ठा व राजा या व्यक्तीवर निष्ठा एकत्र नांदत असल्याने परक्या राष्ट्राचा हेर म्हणजे राजद्रोह, अतएव पाप अशी तिथे मानसिकता होती. ही अडचण भारत-पाकिस्तान यांना परस्परांच्या प्रदेशांत हेर पेरण्यात येत नाही. वंश, भाषा, खाणेपिणे, पेहेराव, अनेक रीतिरिवाज बरेचसे सारखे असल्याने इकडचा नागरिक तिकडे सहज सामावला जाऊ शकतो. दोन्हीकडे परस्परद्वेष असणारे गट, त्यांच्या आपापल्या विचारधारा आहेत. भारतातली विविधता ज्ञात आहे. आपण समजतो तितका पाकिस्तान 'मुस्लिम' एकसंघ नाही कधीच नव्हता. असे वातावरण हेर पेरण्यास उपयोगी ठरते. असे हेर आपलेसे करून पेरण्यासाठी लोभ, वासना, भीती, हाव, बेअब्रूची चिंता हे मानवी भावनांचे हेलकावे वापरले जातील. यात विसाव्या शतकापासून एका नव्या घटकाची भर पडली आहे- 'विचारधारे' वर श्रद्धा यातून पेरलेले हेर जास्त कडवे असतात. कम्युनिझमवर प्रेम वा द्वेष, अतिरेकी इस्लाम, ज्यू, हिंदुत्व, गोऱ्या कातडीचा वंशवाद ही उदाहरणे आपल्या परिचयाची आहेत.

भारतात आता या व्यवस्थेत अनेक संस्था कार्यरत आहेत. त्यांची संपूर्ण यादी इथे दिलेली नाही. यांतल्या काही संस्था आर्थिक गुन्हे (बेनामी पैसा, नकली चलन, चोरटी आयात, परकीय चलनातले गैरव्यवहार, हवाला) शोधण्यासाठी व ते घडू नयेत, म्हणून उपाययोजना सुचवणे-अमलात आणणे यासाठी निर्माण केल्या आहेत. संदेश-वहनांवर लक्ष ठेवण्यासाठी निराळी यंत्रणा असते (सिग्नल इंटलिजन्स). सामान्यपणे यांनी माग काढलेल्या

धाग्यांमधूनही हेरगिरीचे धागेदोरे प्रसंगी सापडतात. सैन्याच्या तिन्ही दळांच्या स्वतंत्र व्यवस्था आहेत. स्थानिक पोलिस यंत्रणांना एखाद्या गुन्ह्याच्या तपासात वा खबऱ्याकरडून एरवी मिळालेल्या माहितीच्या तपासातून शक्य आहे, की परकीय हेर, दहशतवादी यांबद्दल माहिती मिळू शकते.

मात्र 'आयबी' (इंटलीजन्स ब्युरो) ही या क्षेत्रातली केवळ भारतातल्या नव्हे, तर जगातल्या अशा संस्थांपैकी खूप पूर्वी स्थापन झालेली. ब्रिटिश काळात काही संशोधकांनी हिची पाळेमुळे 'पेंढारी व ठगी' यांच्या विरुद्ध उघडलेल्या मोहिमेपर्यंत दाखवली आहेत. थेट स्वातंत्र्य मिळेपर्यंत ही संस्था पूर्णपणे ब्रिटिश आधिपत्याखाली राहिली. भारत सोडताना ब्रिटिशांनी या संस्थेची जवळपास सर्व कागदपत्रे ब्रिटनला 'पळवली' वा भारतातच नष्ट केली. याचे कारण उघड आहे. 'आयबी'साठी स्वातंत्र्याआधी 'काँग्रेस' शत्रुपक्ष होता. ऐकलेली/घडलेली प्रत्येक लहानमोठी गोष्ट टिपून ठेवणे हे ब्रिटिशांचे वैशिष्ट्य होते. त्यामुळे जर ही कागदपत्रे आता नव्याने सत्तास्वीकार करणाऱ्यांच्या पाहण्यात आली, तर ब्रिटनचे भारतातले हितसंबंध धोक्यात येणार, हे उघड होते. 'आयबी'च्या तत्कालीन 'भारतीय' अधिकाऱ्यांत (ब्रिटिश अधिकारी गेल्यावर) सर्वांत वरिष्ठ मुस्लिम होते, जे फाळणी होताच पाकिस्तानात गेले. उरलीसुरली, दुय्यम महत्त्वाची का असेना, कागदपत्रे त्यांनी आपल्यासोबत पाकिस्तानला नेली. त्यामुळे स्वतंत्र भारताला अगदी शून्यातून नसली, तरी मोठ्या प्रमाणात नव्याने बांधणी करावी लागली. 'आयबी' हा ब्रिटिशांच्या जगभर पसरलेल्या 'इंटलिजन्स' जाळ्याचा एक घटक होता. स्वातंत्र्यानंतर भारताचे अंतर्गत व परराष्ट्रातले हेरजाळे उभारणे, शासनाला अंदाज देणे ही कामे 'आयबी'च्या अखत्यारीत राहिली. मात्र साधारण १९५७ नंतर (चीनने तिबेट व्यापणे, सिकियांगमधील रस्ता अक्साई-चीन भागातून तिबेटमध्ये आणणे वगैरे घटनांनंतर परराष्ट्रांत हेरगिरीसाठी स्वतंत्र यंत्रणा उभारणे आवश्यक होते. पंडित नेहरूंनी ते का टाळले, हे समजत नाही. ही उणीव १९६७ साली इंदिरा गांधींनी भरून काढली. 'रॉ' (रिसर्च अँड ॲनलॅसिस विंग) या नावाने यंत्रणा कार्यरत झाली. उणीव जाणवते ती अशी, की या सर्व यंत्रणांमार्फत गोळा होणारी माहिती, विश्लेषण, अंदाज यांचे एकत्रित विश्लेषण करणारी कार्यक्षम संस्था आपण कार्यरत करू शकलेली नाही. या त्रुटीची बोचही कुठे जाणवत नाही.

१९९३ चे मुंबईतले साखळी बॉंबस्फोट, अक्षरधाम, संसदेवर हल्ला, पुणे-हैद्राबाद-बंगळूर-वाराणसी इथले स्फोट, २६/११-मुंबई या सर्वांत स्थानिक मंडळींचा सहभाग असल्याखेरीज हे सर्व घडवणे अशक्य आहे. अशा प्रकारांचा शोध, प्रेरणास्थानांचा मार्ग, न्यायालयात टिकेल असा पुरावा गोळा करणे हे सर्व शांतपणे, एकएक धागा जुळवत संभाव्य चित्र तयार करण्याचे काम आहे. त्यामुळे असे सर्व प्रकार घडण्याआधी कट उघडकीस येत मुळातून नष्ट करता येणे, प्रत्येक वेळी शक्य होईलच असे नाही. अलीकडे उघड झालेल्या माहितीप्रमाणे (माहिती संसदेत दिली गेली आहे) गेल्या तीन वर्षांत पाकिस्तानने भारतात पेरले-पोसलेली तीस दहशती केंद्रे शोधून नाहीशी करण्यात यश आले. यात जी धरपकड झाली ती त्यात दहा पाकिस्तानी तर अडतीस भारतीय नागरिक आहेत, ज्यांत दहा शासकीय कर्मचारी आहेत.

हे सर्व एकतर्फी म्हणजेच पाकिस्तानप्रणीत कृत्यांचा भारत साक्षीदार, आम्ही फक्त सहन करतो आहोत, असे आहे का? अर्थातच नाही.

सत्तरीच्या दशकाच्या शेवटी व ऐंशीच्या दशकात स्वतंत्र राष्ट्र–खलिस्तान–या हिंसक चळवळीने व्यापक व उग्र स्वरूप धारण केले. भिंदरावाले यांच्या कारवाया, ऑपरेशन ब्ल्यू स्टार, इंदिरा गांधींचा खून अशा घटना घडल्या. इतरही अनेक खून, अत्याचार झाले. संपूर्ण पंजाब अशांत झाला पंजाबच्या पोलिस यंत्रणेचे मनोधैर्य टिकवत ज्युलिअस रिबेरो व के. पी. एसगिल या वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्यांनी अत्यंत चिवट तसेच कडवी मोहीम चालवून चळवळ थंड पाडण्यात मोलाचे योगदान दिले. या 'खलिस्तान' चळवळीला पाकिस्तानची फूस होती. मुक्तहस्ते पण छुप्या रीतीने पैसा, शस्त्रे, प्रशिक्षण, प्रसंगी आश्रय अशी मदत पाकिस्तान करत होता. हे लक्षात आल्यावर 'रॉ'ने हेच मार्ग बलुचिस्तान-सिंध भागात राबवताच आता द्यावी लागणारी ही किंमत परवडणारी नाही, हे गणितात घेत पाकिस्तानने मदत थांबवली. केंद्र

शासनाच्या परवानगीशिवाय असे पाऊल 'रॉ' ने उचलणे अशक्य आहे. १९७१ साली बांगलादेशप्रकरण उद्‌भवले. युद्ध पेटण्याआधी निदान सहा महिने आधीपासून भारत छुपी मदत देत होता. ३ डिसेंबर १९७१ च्या सायंकाळी पाकिस्तानने जामनगर, जोधपूर, अमृतसर, अंबाला...या व अशा भारताच्या आघाडीच्या विमानतळांवर हवाई हल्ला चढवला, या नियोजित हल्ल्याची वेळ, तारीख व ठिकाणे याचा संपूर्ण तपशील हेरव्यवस्थेतून पुरेसा आधी कळला होता. भारताने तो प्रसंग अशा कुशलतेने हाताळला, की नुकसान तर होऊ नये, पण सोबत ही माहिती आपणांस आधी कळली होती, हे उघड होऊ नये. असे करणे यासाठी आवश्यक होते, की या माहितीचा जो स्रोत पाकिस्तानात होता, तो उघड होऊ नये; युद्ध सुरू असताना ढाका येथे वरिष्ठ नागरी-सैनिकी अधिकाऱ्यांची बैठक होत असल्याची बातमी 'इंटलीजन्स'द्वारा कळल्यामुळेच भारतीय विमानदलाला तिथे बाँबहल्ला करता आला. याची परिणती त्या नेतृत्वाचे मनोधैर्य कोसळत शरणागती स्वीकारण्याच्या मार्गावर ते आले. शेख मुजिबुर रहमान (बांगलादेशचे मुक्तिनेते) यांच्या हत्येचा कट शिजला असल्याची पक्की माहिती भारताला मिळाली होती. मुजिबना सावध करण्यासाठी खूपच उच्चस्तरावरून पावले उचलली गेली. त्यांना व कुटुंबीयांना वेळीच भारतात आणण्यासाठी विमानही सज्ज ठेवण्यात आले होते. मात्र आपल्याविरुद्ध असा कट असू शकतो, हे मुजिबना काही केल्या पटेना. शेवटी हत्या झालीच (१५ ऑगस्ट १९७५). १९६५ व १९७१ ही पाकिस्तानशी युद्धाची वर्षे. या दोन्ही प्रसंगी राजस्थानमधून सिंधमध्ये फौजा गेल्या तसेच पंजाबमध्ये १९६५ मध्ये लाहोरच्या बाटानगर या उपनगरापर्यंत फौजा गेल्या. त्यांना पाकिस्तानी सैन्यतुकड्यांच्या जागा चुकवत आत शिरण्याच्या वाटा दाखवणारे कोण होते? पाकिस्तान हे 'इस्लामिक' राष्ट्र म्हणून घोषित असल्याने नशाबंदी आहे. अर्थात दारूला मोठी मागणी असते. भारतातून चोरट्या मार्गाने तिकडे दारू नेणारे व परतताना सोने, घड्याळे, इलेक्ट्रॉनिक वस्तू अशी तस्करी करणाऱ्या भारतीयांनी. हेरव्यवस्थेचा यांच्याशी संपर्क होता. चोरटी वाहतूक करणारे देशप्रेमी नसतातच असे नव्हे. दुसऱ्या महायुद्धात अमेरिका व ब्रिटनच्या फौजा ६ जून १९४४ रोजी जर्मनहाती असलेल्या फ्रान्सच्या नॉर्मंडी इथल्या किनाऱ्यावर उतरल्या. त्या काळात पिछाडीवरून जर्मन फौजांची रसद तोडणे, रेल्वेमार्ग-तारायंत्र जाळे अस्ताव्यस्त करणे, रस्ते-पूल उडवणे या कामात फ्रेंच सामान्यांसोबत फ्रान्सच्या 'माफिया' टोळ्यांनी प्रचंड मदत तर केलीच;. स्वतःही सहभाग घेतला.

पाकिस्तान घडवतो त्या कृत्यांचे आपण फक्त बळी आहोत, या मानसिकतेतून बाहेर पडणे आवश्यक आहे. असे सर्व सुरू असताना काही कट उघडकीला येणे, काही वेळेत न उलगडणे, काही हेर पकडले जाणे हे अनादी कालापासून सुरू आहे. 'परफेक्ट स्पाय' (भाषांतर अवघड) कोण? जो हेर होता हे कधीही उघडकीला येत नाही तो. युद्ध-मग ते छुपे असो वा उघड-माणूसजातींच्या पाचवीला पुजलेले आहे. हेरव्यवस्था हे त्याचे एक महत्त्वाचे अंग आहे. यात कुणीही धुतल्या तांदळासारखा नसतो.

हेरव्यवस्थेचे क्षेत्र 'नाही चिरा' 'नाही पणती' या कक्षात मोडते. परदेशी नेमलेल्या हेरांना पहिले हे सांगितले जाते, की पकडले जाऊ नका. तसे झालेच तर शासन आमचा काही संबंध नाही असेच म्हणणार. काही वेळा दोन राष्ट्रे पकडले गेलेल्या आपापल्या हेरांना देवाणघेवाणीच्या मार्गाने सोडवूनही घेतात. मात्र प्रसंगी आपल्याच हेराला परदेशात ठारही करावे लागते. या क्षेत्रात वर्ज्य-अवर्ज्य असे काही नसते.

त्यामुळे कमी बोलण्यासाठी काय घ्याल, असा प्रश्न आपण आपल्या वर्तुळात विचारायला हवा. आपली वर्तमानपत्रे, नियतकालिके, विद्यापीठे, शासन-प्रशासनातले नेते, दूरचित्रवाणी इत्यादींनी सर्वसामान्यांना थोडे विचारी करण्यासाठी पावले उचलण्याची गरज आहे. ज्या गोष्टी खाजगी खोलीतही हळू आवाजात आवश्यक तेव्हाच बोलायच्या, त्यांची चर्चा दूरचित्रवाणीवर आणि जाहीर सभांमधून मुठी आवळत करण्याची सवय सोडायला हवी. यात काही दूरचित्रवाहिन्यांनी सर्व ताळतंत्र सोडून खूप दिवस झाले. स्वतःचे एक अतिरंजित गृहीत ठरवून त्याच्या जरा विरोधी मत येऊ लागताच समोरचा जणू अमर्याद उलटतपासणीसाठी आपल्या हाती दिला आहे,







अनुक्रमणिका

# ग्रेस यांच्या दोन कविता : 'डोळे' आणि 'दुपार'

डॉ. माधवी देसाई

Pure Poetry लिहिणाऱ्या कविवर्य पु. शि. रेगे यांच्या काव्यगोत्रातील कवी ग्रेस यांनी मराठी काव्यक्षेत्रात Pure Poetry च्या कक्षा विस्तृत केल्या; पण दुर्बोध कवी म्हणूनच ग्रेस यांच्याविषयी अधिक चर्चा झाली. असे असले, तरीही त्यांच्या कवितेचा एक संगीतवेडा रसिकवर्ग आहे. सुरांना सर्रकन आकर्षून घेणारी त्यांची नादमय, गेय, शब्दवेल्हाळ कविता रसिकांना गुंगवून ठेवते. ग्रेस यांची कविता पार्थिवात रमतानाच अपार्थिवाचा शोध घेते; पण हा शोध खुद्द कवीचाच न संपणारा आत्मशोध आहे. इंद्रियनिष्ठ संवेदनांच्या अभिव्यक्तीत गुंतणारी, संगीतसुरांबरोबर समांतर धावणारी, आत्मसंवादात्मक, आत्मविश्लेषणात्मक आणि आत्मसमर्थक अशी ग्रेस यांची कविता एक विचित्र अनामिक ताणातून निर्माण झाल्याचे जाणवते. एकतर स्वतः कवी 'द्वैती' असल्याने तो द्वैताचा ताण त्यांच्या कवितेतून दिसतोच. काही वेळा हा ताण सैल होताक्षणी ग्रेस 'अद्वैता'च्या वृक्षावर क्षणभर विसावतातही, पण पुन्हा 'द्वैती' होतात. या ताणाबरोबरच कालविसर्जन हेही ग्रेस यांच्या कवितेचे एक असे वैशिष्ट्य आहे, की त्यामुळे त्यांची कविता एकाच वेळी दुर्बोध आणि सुबोधही होते. शब्दविसर्जन हासुद्धा ग्रेस यांच्या कवितेत आढळणारा घटक असल्याने कवितेतील शब्दांच्या अर्थाला, काव्यार्थाला धूसरता येते. कालविसर्जन घडताना ग्रेस प्रतिभेच्या पातळीवर, निर्मितीच्या तंद्रीमध्ये पुराणकाळात– रामायण--महाभारताच्या, इतिहासाच्या काळात–जातात आणि तत्कालीन व्यक्तींशी किंवा त्या त्या प्रतिमांशी संवाद साधताना ते त्यांच्यासह स्वतः त्याच काळात वावरतात किंवा त्या व्यक्तींना वर्तमानात आणून त्यांच्यासह स्वतः वावरतात. त्याही पुढे जाऊन, वर्तमानातील व्यक्तींचे पौराणिक व ऐतिहासिक काळाशी अनुसंधान साधून काव्यगत असे तिसरेच जग निर्माण करतात. त्या जगातल्या प्रतिमासृष्टीत रममाण होऊन आत्मसंवाद साधतात. हा संवाद तरल, उत्कट असतो; पण त्याच्या केंद्रस्थानी फक्त स्वतः 'ग्रेस' असतात. या कालविसर्जनामुळे ग्रेस यांच्या कवितेतील मिथ, जातक कथा, लोककथा, कल्पित कथा आणि त्यांतील व्यक्ती रसिकांना परिचित असल्यामुळे ग्रेस यांची कविता अर्थबोध झाला किंवा अल्पार्थ बोध झाला, तरी परिचित वाटते. ग्रेस यांची प्रगल्भ भाषिक जाण, समृद्ध शब्दभांडार आणि नवीन शब्दजोडणीच्या कौशल्यामुळे ग्रेस यांची भाषा सौंदर्यवती बनते; म्हणून तिच्यात रसिकांना भुलविण्याचे सामर्थ्य आहे. सलग अर्थसंगतीचा एकसंध अनुभव येत नसला, तरी ज्या उत्कट, तीव्र भावसंवेदना ग्रेस यांच्या कवितेतून येतात, त्या वाचकांना पुनःप्रत्ययाच्या आणि प्रचितीच्या धूसर धुक्यात घेऊन जातात. त्यामुळे वाचक वेडावून जातो आणि ग्रेस यांच्या कवितेच्या प्रेमात पडतो. पौराणिक, ऐतिहासिक काळातील स्त्री-परुष, बालक-बालिका इत्यादींच्या प्रतिमांमधून ग्रेस यांच्या कवितेत काही भावजाणिवा, संवेदना व्यक्त होतात; त्यांची पुनरावृत्ती सतत होत राहते. उदा., भय, उदासी, एकाकीपण, दुःख, मातृविरह इत्यादी. रामायण-महाभारतातील स्त्रीप्रतिमा त्यांच्या कवितेत बहुलतेने पुनरावृत्त होतात. सीता, ऊर्मिला, अहल्या, गांधारी, कुंती, द्रौपदी, राधा इत्यादी प्रतिमा आधिक्याने येतात. सीता ही रामायणाची नायिका. तिची अनेक नावे आहेत. उदा., जानकी, वैदेही, मिथिला, भूमिकन्या, मैथिली इत्यादी. ही स्त्रीप्रतिमा वेगवेगळ्या नावाने आणि भावार्थाने अभिव्यक्त होते. त्यांपैकी दोन कवितांमधून याचा कसा प्रत्यय इथे येतो, ते पाहण्याचा प्रयत्न इथे केला आहे. कवितांची शीर्षके आहेत. १)'डोळे', २)'दुपार'.

ग्रेस आपल्या कवितेत कधी स्त्रीच्या भूमिकेतून भावाविष्कार करतात, तर कधी प्रथमपुरुषी एकवचनी आत्मनिवेदन करतात. असे का घडते?.... कारण स्त्रीमुखातून, स्त्रीभूमिकेतून ग्रेस जेव्हा व्यक्त होतात,

अनुक्रमणिका

तेव्हा प्रतिमापातळीवर ते स्वतः स्त्रीच झालेले असतात. प्रत्येक पुरुषाच्या मनात एक स्त्रीमनाचा कोपरा असतो, त्याला कार्ल युंग 'ॲनिमा' असे म्हणतो. तसेच प्रत्येक स्त्रीच्या मनातही पुरुषप्रतिमेचा, पुरुषमनाचा एक कोपरा असतो, ज्याला कार्ल युंग 'ॲनिमस' असे म्हणतो. ग्रेस यांच्या कवितांतून या 'ॲनिमा'चा आविष्कार होताना ती कविता स्त्रीमुखातून अवतरते. उदा., पाऊले, जन्म, हळवी, चांदणे, जीवाची वैष्णवी, बाहुली, तळपाय, रंग इत्यादी.... परंतु ग्रेस यांची 'डोळे' ही कविता मात्र ॲनिमा..ॲनिमस दोन्हींचा आविष्कार करते. 'डोळे' या कवितेतून स्त्री-पुरुष/ नायक-नायिका यांच्यातील प्रेमभावसंवाद शब्दबद्ध झाला आहे. पौराणिक स्त्री-प्रतिमेचे उपयोजन कवीने येथे केले आहे. कवितेत कवीच्या आत्मसंवादाची प्रचिती येते. 'डोळे' कविता पुढीलप्रमाणे-

**डोळे**

एक सांज अशी
तिचा रंग जरा लाल
माझ्या कपाळाला
तुझ्या धुळीचा गुलाल

....एक रात्र अशी
तुझे सीतेपरी डोळे
रूप पाहताना
नभी अंधार पाजळे....

प्रथमदर्शनी कविता 'स्त्रीमुखा'तून आहे असे वाटते; परंतु ही कविता केवळ स्त्रीमुखातून नाही, तर संवादात्मक आहे. प्रेमी युगुलाचा शृंगारानंतरचा संवाद कवीने शब्दबद्ध केला आहे. कवितेच्या पूर्वार्धातील चार ओळी स्त्रीमुखातून आणि उत्तरार्धाच्या चार ओळी कवीच्या स्वमुखातून येतात. नायिका आणि नायकाचे मन, भावभावना त्यांतून व्यक्त होतात. नायिकेची भावःस्थिती कवितेच्या पहिल्या चार ओळींतून दिसते. एका प्रणयरम्य संध्याकाळी लालरंगी सूर्यकिरणांच्या उधळणीमध्ये नायिकेने शृंगारानुभूती घेतली आहे. उत्कट तृप्त भावनेने सुखावलेल्या प्रेमिकेला आपल्या प्रियकराचे प्रेम आणि त्याची पायधूळ सौभाग्याप्रमाणे वाटते आहे. सांध्य-पश्चिमेला झालेली लाल रंगाची उधळण म्हणजे उभयतांच्या कामभावनेचा लालिमा आहे. त्याच्या प्रीतीचा लाल गुलाल तिच्या कपाळाला लागला आहे. या ठिकाणी एक पारंपरिक देश्यभाव व्यक्त होतो. पतिव्रतेला तिच्या पतीच्या पायाची धूळ म्हणजे सौभाग्यकुंकुमच वाटते, या अर्थानेही 'माझ्या कपाळाला, *तुझ्या धुळीचा गुलाल' या प्रतिमा येतात. या दोन ओळींनी* कवितेतील कामभावाचे, प्रणयशृंगाराचे उदात्तीकरण, उन्नतीकरण होते. नायिका/प्रेमिका आपल्या प्रियकराशी एकनिष्ठ उत्कटतेने तनामनाने सर्मपित झाली आहे. तो पातिव्रत्यभाव या चार ओळींतून व्यक्त होतो. या चार ओळींतील बारा शब्दांतून उत्कट प्रीती, तप्त, तृप्त शृंगार आणि सर्मपित प्रेमभावना व्यक्त होते. त्यामुळे कवितेला देशीयता आणि अल्पाक्षरबह्वर्थकता येते; आणि वाचक आतुरतेने पुढील कविता वाचू लागतो. ....की आता पुढे काय?

कवितेच्या उत्तरार्धात संध्यासमयाचे रूपांतर रात्रीमध्ये झाले आहे. त्यात नायकाचे/प्रियकराचे मनोगत आहे. नायिकेची रम्य सुरंगी संध्याकाळ आता नायकाची रमणीय रात्र झाली आहे. हे प्रेमी युगुल उत्कट प्रीतीचा अनुभव घेते आहे....पण आता नायक स्वमन अभिव्यक्त करतो आहे. कडव्याच्या प्रारंभी चार टिंबे .... आहेत. त्या चार टिंबांनी संध्याकाळ आणि रात्र यांमधील अंतर जसे सांगितले आहे, तसेच त्यादरम्यानच्या काळातील प्रियकर-प्रेयसीच्या गुजगोष्टींचेही बोल अबोलपणे सांगितले आहेत. जी 'एक सांज' प्रियतमेची होती, तीच 'एक सांज' आता प्रियकराची 'एक रात्र' झाली आहे. प्रियतमेचे समर्पण त्याने कमालीच्या तरलपणे स्वीकारले आहे. म्हणूनच तिच्या गहिऱ्या नजरेच्या डोहात पाहताना त्याला तिचे डोळे 'सीतेपरी' वाटताहेत. 'सीता' ही प्रतिमा पातिव्रत्याचा पारंपरिक तेजस्वी मानदंड आहे. आपल्या प्रियतमेचे समर्पण कवीच्या इतके हृदयाला भिडले आहे, की त्या उत्कट संपूर्ण समर्पणाने तो हळवा, कातर झाला आहे. तिच्या एकनिष्ठ, पवित्र प्रेमाचे प्रतिबिंब त्याला तिच्या डोळ्यांत दिसते आहे. तो म्हणतो,

"....एक रात्र अशी
तुझे सीतेपरी डोळे
रूप पाहताना
नभी अंधार पाजळे...."

कवीला प्रियतमेचे सीतेसारखे एकनिष्ठ, निरागस

शांत तरीही तेजस्वी प्रेम, आनंद आणि उभारी देणारे वाटत आहेत. त्यामुळे नायकाच्या मनातील उदासीनतेचा अंधार उजळून पाजळतो आहे. हे अंधार पाजळण्याचे सामर्थ्य तिच्या आश्वासक तेजस्वी डोळ्यांत आहे. तिचे 'सीतेपरी डोळे' त्याला आशावादी बनवतात. शिवाय नायिकेचे रूपही तेजस्वी आहे. दुसऱ्या कडव्यानंतरही आलेली चार टिंबे (....) नायकाच्या भावी आशावादाबद्दल, भावविश्वाबद्दल अबोलपणे बरंच काही सांगतात; म्हणजे प्रियतमेचे 'सीतेपरी डोळे' आणि 'नभी अंधार पाजळणारे' रूप पाहून कवीचे चलबिचल, अस्थिर मन आश्वस्त, स्थिर झाले आहे. निराशेचा अंधार दूर झाला आहे.

'डोळे' या कवितेचे सलग वाचन केल्यावर तिचे संवादरूप लक्षात येत नाही. किंबहुना वाचक गोंधळून जातो. पहिल्या कडव्यामध्ये म्हणजेच पूर्वार्धामध्ये 'माझ्या कपाळाला तुझ्या धुळीचा गुलाल' म्हणणारी स्त्री दुसऱ्या कडव्यात म्हणजेच उत्तरार्धात 'तुझे सीतेपरी डोळे' हे शब्द कोणाला उद्देशून म्हणत असावी? ती कोणाचे रूप पाहते आहे? 'सीतेपरी डोळे' असणाऱ्या स्त्रीच्या रूपाने 'माझ्या कपाळाला तुझ्या धुळीचा गुलाल' म्हणणाऱ्या स्त्रीच्या जीवनातील अंधार कसा पाजळेल?... असे प्रश्न वाचकांना पडतात. त्यांची दिशाभूल होते. काहीतरी गडबड आहे, इतकेच नव्हे तर कविता दुर्बोध आहे, असेही वाटते. पण कविता पुन्हा पुन्हा वाचली, की त्यातील संवाद समजतो. धुळीचा गुलाल, कपाळाला धुळीचा गुलाल, सीतेपरी डोळे, नभीचा अंधार पाजळे या शब्दांनी कवितेला पारंपरिक देशीयता येते. 'डोळे' ही या कवितेतील केंद्रप्रतिमा आहे. कवितेचे शीर्षकही 'डोळे' असेच आहे. कवितेचे स्वरूप संवादात्मक असल्याने त्यात दोन मनांची अभिव्यक्ती आहे; त्यामुळे कवितेला समतोलत्व आले आहे. 'डोळे' ही प्रतिमा आशयघन झाली आहे. भयमुक्त आणि स्थिर झालेले कवीचे/नायकाचे मन 'नभ' या प्रतिमेतून प्रगटले आहे. 'अंधार' आणि 'पाजळे' या दोन विरोधदर्शक शब्दांतील विरोधलय कवितेलाही उजळून टाकते. 'सीता' ही स्त्रीप्रतिमा पौराणिक असली, तरी या कवितेत ती 'डोळे' या नामाचे विशेषण बनून येते.सीतेपरी डोळे.... सीतेसारखे डोळे; पण यामुळेही कवितेला वेगळेच परिमाण मिळते. 'सीता' ही रामायणातील प्रतिमा असूनही येथे 'राम' ही अव्यक्त प्रतिमा शेवटपर्यंत अव्यक्तच राहते. ती वाचकांच्या समोर येत नाही. येथे 'सीतेपरी डोळे' असलेल्या नायिकेचा नायक 'राम' नाही. ग्रेस यांनी घेतलेली स्त्रीरूपाची अनुभूती जाणवत राहते; त्याचबरोबर ग्रेस यांचे भयग्रस्त मन, अंधारे नैराश्यही कवितेत व्यक्त होते. सीता ही प्रतिमा विशेषणाच्या रूपात आल्याने तिच्या जोडीला 'राम' ही पौराणिक प्रतिमा पारंपरिक साहचर्याने येत नाही. सीता ही स्त्रीप्रतिमा विशेषणरूपाने येऊनही स्वतंत्रपणे येते, हे या कवितेचे वैशिष्ट्य आहे.

ग्रेस आणि संध्याकाळ हे जणू समीकरणच बनले आहे. 'संध्याकाळच्या कविता', 'सांध्यपर्वातील वैष्णवी', 'सांजभयाच्या साजणी', 'संध्यामग्न पुरुषाची लक्षणे', 'सांध्यपर्व' ही अनुक्रमे कवितासंग्रह, ललितबंधसंग्रह, दृक्‌श्राव्यध्वनिचित्रफीत यांची शीर्षके ग्रेस यांची 'सांध्यप्रीती' दर्शवितात.

"ही माझी प्रीत निराळी
संध्येचे श्यामल पाणी"

असे आपल्या प्रीतीचे वर्णन करणारे ग्रेस संध्याकालाविषयी लिहितात, "संधिकाल हा माझ्या निर्मितिप्रदेशाला शाप, अभिशाप आणि उःशाप या त्रिवेणी धारणेतून निसर्गाकडून मला मिळालेला माझा वाटा आहे. बेसिक मूलभूत वाटा आहे." -(मृगजळाचे बांधकाम, पृष्ठ ५२)-ग्रेस यांच्या अनेक कवितांतून, ललितबंधातून असंख्य वेळा संध्याकाळचे वर्णन येते. असा हा संध्यासमयाचा कवी आपल्या काही कवितांतून दिवसाच्या अन्य कालःस्थितीची वर्णने करतो. ग्रेस यांची 'दुपार' ही कविता 'संध्याकाळच्या कविता' या कवितासंग्रहात आहे. या कवितेत ग्रेस यांनी 'दुपार' या दिनमानाचे सुंदर वर्णन केले आहे. या कवितेतही मैथिली ही स्त्रीप्रतिमा येते. ही कविता पुढीलप्रमाणे-

**दुपार**

विवर्त नभ एकटें सतत तापलेली हवा
उन्हात जणुं मैथिली तुजसि शोधिते राघवा...
विवस्त्र मृगतंद्रिने क्षितिज वाहते कीं पुढें
तृषार्त बिलगे मला सभय चातकांचा थवा.
तुझे तटचि पांगळे तरिही विश्व यावे गळीं






अनुक्रमणिका

अशा आवेशात हे 'अँकर' वावरत असतात.

यासंबंधी एक मोठे उदाहरण इथे अप्रस्तुत ठरणार नाही. दुसऱ्या महायुद्धात गणित-तंत्रज्ञान-भाषाशास्त्र यांच्या आधारे जर्मनी-जपानची अनेक महत्त्वाची गुपितं ब्रिटिशांनी शोधली. हे सर्व साध्य झाले जपान-जर्मनीच्या अनेक सांकेतिक भाषांची फोड करून. या यंत्रणेत प्राध्यापक, गणिततज्ज्ञ, अधिकारी, तंत्रज्ञ, टंकलेखक, यंत्रकामगार, खेळाडू, निरोपे, ड्रायव्हर, आचारी, सफाई कामगार.... एक गावच वसले होते. ब्रिटनच्या अनेक भागांतून आलेले स्त्रीपुरुष. युद्ध संपल्यावर ही दहा हजारांहून जास्त मंडळी आपापल्या नागरी जीवनात परतली. हे राष्ट्रीय गुपित युद्धकाळ, युद्धसमाप्ती (१९४५ ते १९७४) अशी जवळपास तीस वर्षे सांभाळले गेले. उघड झाले ते शासनाने तसा निर्णय घेतल्यावर.

श्रीलंका, पाकिस्तान, बांग्लादेश इथल्या समुद्रात भारतीय मच्छिमार पकडले जातात. आपणही त्यांचे पकडतो. यांच्यापैकी १००% सर्वजण फक्त मासेमारीसाठीच आले होते, ही खात्री कोण देणार? मुंबई २६/११ च्या दहा मंडळींना येण्यासाठी वाहन, उतरण्याची जागा आठवावी.

कुंपणही कधी कधी शेत खाते. सुक्याबरोबर ओलेही जळते. असे होऊ नये हे खरे; पण होत असते हे सार्वकालिक सत्य आहे.

शत्रुराष्ट्राच्या अशा कारवाया विफल व्हाव्या यासाठी सामान्य नागरिक म्हणून आपला सहभाग आपण किती देतो? रस्त्यावर गोंधळ, वाहने पेटवणे, मेणबत्या मोर्चे हे सर्व फोल आहे. एक साधे उदाहरण : आपल्या मालकीच्या वास्तूत भाडेकरी (पेइंग गेस्ट, लीज....कुठलाही प्रकार) ठेवला तर त्याचा त्या ठिकाणच्या पोलिस व्यवस्थेला तपशील देणे कायद्याने आवश्यक आहे. हे आपण करतो का? अशी माहिती येते, त्याची काही टक्केतरी तपासणी करण्याची क्षमता पोलिसदलाकडे आहे का? जर माहिती येत नसेल, तर शासन काय पावले उचलते?

राजा, या क्षेत्रात रात्र नेहमी वैऱ्याचीच असते. जागा राहाच; पण उरबडवेपणा सोड.

☆ ☆ ☆

सुवर्ण वन पेटलें तुझिं न आसवें मोकळी...
प्रशांत नगरात या घराचि सापडेना मला
जिथे अधर गोंदिला पिळुनी वासनेचा दिवा.
विराण नुपुरापरी नभचि तीक्ष्ण झालें निळें
उन्हात जणुं दीप्तिचे फुटुनि सांडते की तळें
विदग्ध प्रतिमेपरी सगुण ऊन झेलू नको
तुझे अमल दुःख दे मजसि तेवढा जोगवा....

या कवितेतील दुपारचे वर्णन वाचनीय आहे. भर दुपारच्या तप्त उन्हाने नभामध्ये उष्ण हवेच्या लाटा कल्लोळ उठवीत आहेत. अशा उन्हाला कवितेतील विरहवेदना साथ देते आहे. या उन्हात मैथिली राघवाला शोधते आहे, असे कवी राघवाला सांगतो आहे. म्हणजे प्रातिभपातळीवर कालविसर्जनामुळे कवी रामायणकाळात विहरत आहे किंवा कवीच्या वर्तमानात 'मैथिली' आणि 'राघव' अवतीर्ण झाले आहेत. अशा दुपारच्या उन्हात मृगजळाचा पाठलाग करताना जी मृगतंद्री लागली आहे, त्यामुळे क्षितिज मृगजळाबरोबरच पुढे पुढे धावते आहे. अशा वेळी तृषार्त चातकांचा थवा भयाकुल होऊन कवीला बिलगला आहे.... ग्रेस यांच्या मुलीचे नाव 'मिथिला' म्हणजे मैथिली आहे आणि मुलाचे नाव 'राघव' आहे. आईविना पोरकी असलेली ही लेकरे ग्रेस यांच्या नजरेसमोर असावीत. आईच्या वात्सल्यासाठी तहानलेली ही पाडसे आईसाठी व्याकूळ आहेत; ती तृषार्त चातकांप्रमाणे सभय होऊन ग्रेस या आपल्या पित्याला बिलगली आहेत.

कवितेच्या मध्यावर दुसऱ्या कडव्यात कवीची भावनिक विकलावस्था आणि एकटेपण व्यक्त होते..... दुपारच्या वेळी सोने वितळून जावे एवढे उन्ह पसरले आहे, की जणूकाही 'सुवर्णवन'च पेटले आहे, असे भासते. अशा वेळी प्रियतमेच्या स्मृतींनी कवीचा गळा दाटून आला आहे. विरहाने सर्व विश्वच आर्त आठवणींच्या रूपाने गळ्यात दाटून आले आहे. कारण या लेकरांची आई 'पल्याड' गेली आहे. त्या नदीचे 'पांगळे तट' तिला 'अल्याड' येऊ देणार नाहीत. तिच्या आठवणी या पेटलेल्या सुवर्णवनात धगधगत आहेत; पण डोळ्यांत अश्रू मात्र येत नाहीत. भयाकुल अवस्था आणि सभय चातकपिलांची बिलगलेली अवस्था अशा स्थितीत या प्रशांत नगरात कवीला घर सापडत नाही. घराची स्वामिनीच नसल्याने 'घरहीन' अवस्था झाली आहे. ही दिशाहीन सैरभैर एकाकी अवस्था कवीला जीवघेणी वाटते आहे. ज्या वासनेचा दिवा पिळून, वासनेच्या व्यक्त होण्यातून बालके जन्मली (अधर गोंदिला पिळुनी वासनेचा दिवा) ते 'बालअधर' निष्पाप एकाकी आहेत. आईच्या मायेला पारखे झाले आहेत, ही जाणीव ग्रेस यांना व्याकूळ करते आहे.

कवितेच्या अंतिम भागात, तिसऱ्या कडव्यात वेगळ्या भावसंवेदना व्यक्त होतात. पहिल्या कडव्यातील कल्लोळमय निळे नभ आता पैंजणातून तुटून एका बाजूला पडलेल्या एकाकी नुपुराप्रमाणे तीक्ष्ण झाले आहे. नभ म्हणजे उन्हाच्या प्रखर दीप्तीचे तळे आहे. आणि ते तळे फुटून सगळीकडे तप्त उन्ह सांडते आहे. ही दुपार म्हणजे आकाशदीप्तीच्या तळ्याचे प्रवाही तेज आहे, अशी कल्पना ग्रेस यांनी केली आहे.

"विदग्ध प्रतिमेपरी सगुण ऊन झेलु नको
तुझे अमल दुःख दे मजसि तेवढा जोगवा!"

या शेवटच्या दोन ओळी कवितेत 'सवता सुभा' मांडतात. इथे कवीची प्रीती आणि दुःखप्रीती व्यक्त होते. कवी आपल्या प्रियतमेला उद्देशून म्हणतो, की हे सगुण ऊन तू झेलू नको; तुझे अमल दुःख मला जोगवा म्हणून दे...- इथे ग्रेस दुःखाला 'जोगवा' म्हणून दुःखप्रीती व्यक्त करतात. पत्नीचा मृत्यू अटळ आहे आणि 'अमल' आहे. कारण 'मृत्यू' हा सूर्यप्रकाशासारखाच सत्य आणि स्वच्छ आहे. म्हणून त्याचे दुःख-त्या दुःखाचे स्वरूप 'अमल' आहे-ते दुःख जोगवा समजून ग्रेस यांनी स्वीकारले आहे.

या कवितेतही ग्रेस यांच्या नित्य आवडीच्या आणि वाचकांच्या परिचयाच्या पौराणिक प्रतिमा आहेतच. त्यातून तुटक तुटक आशयखंड आणि भावजाणिवा व्यक्त होतात. कवितेला दुहेरी संदर्भातून वाचली, की तिचा अन्वय वेगवेगळा लागतो. कवितेत बरेचसे व्यक्तिगत संदर्भ असले, तरीही कवितेतील दुपारचे वर्णन वाचनीय आहे. सुंदर निसर्गप्रतिमांनी दुपारचे अगदी नेमके चित्र काव्यबद्ध झाले आहे.

'विवस्त्र मृगतंद्रिने क्षितिज वाहते की पुढे'
'विराण नुपुरापरी नभाचे तीक्ष्ण झालें निळें'



अनुक्रमणिका

'उन्हात जणु दीप्तिचे फुटुनि सांडते की तळें' या ओळींतून कवीने दुपारचे चित्र इतके हुबेहूब रेखाटले आहे, की स्वभावोक्ती अलंकाराची प्रचिती येते. प्रतिमांची चपखल योजना कवीचे भाषावैभव सांगते. 'जोगवा' या प्रतिमेतून आदिमाय/देवी ही आदिबंधात्मक प्रतिमा अव्यक्तपणे येते; त्यामुळे दुःखाला देवीच्या जोगव्याचे पावित्र्य येते. हे दुःख केवळ अमल नाही, तर अनंत आहे; कारण कवितेच्या शेवटच्या ओळींच्या शेवटी अमर्याद, अनंत काळ आणि अंतर दर्शविणारी टिंबे येतात.

विवर्त नभ, एकटे नभ, प्रशांत नगर, न सापडणारे घर या प्रतिमा कवीचे दिशाहीन एकटेपण, एकाकीपण सांगतात. दुपारच्या तप्त एकाकीपणात कवीच्या भावोर्मी दाटून येतात. त्याचा आलेख या प्रतिमांनी रेखाटला आहे.

विवर्त नभ, विवस्त्र मृगतंद्री, सभय चातकथवा, पांगळे तट, प्रशांत नगर, विराण नुपूर, विदग्ध प्रतिमा, अमल दुःख या आणि अशा विशेषण-विशेष्याच्या जोड्या ग्रेस यांच्या शब्दकळेवर असलेला पु. शि. रेगे यांच्या भाषेचा प्रभाव दर्शवितात. पु. शि. रेगे यांचे शब्दलाघव आणि विशेषण-विशेष्याच्या नव्या जोड्या तयार करण्याची शैली ग्रेस यांनी स्वीकारल्याने त्या शैलीचा प्रत्यय ग्रेस यांच्या याही कवितेतून येतो.

'दुपार' कवितेतही काही शब्द/ओळी असंबद्ध राहतातच. 'उन्हात जणु मैथिली तुजसि शोधिते राघवा...' हे विधान ग्रेस यांचे व्यक्तिगत, कौटुंबिक संदर्भ सोडून विचारात घेतले, तर ते विधान ग्रेस कोणाला उद्देशून करतात, की ते स्वतः रामायणकाळात जाऊन (प्रारंभी उल्लेखिलेल्या कालविसर्जनामुळे) रामाला मैथिलीचा निरोप किंवा ठावठिकाणा सांगत आहेत, याचे संदर्भ कवितेत नाहीत. रामायणात राम/राघव हा मैथिलीला/सीतेला शोधत होता. परंतु मैथिलीसाठी/सीतेसाठी राम/राघव अज्ञात ठिकाणी नव्हता. त्यामुळे ती राघवाला शोधत असल्याचा संदर्भ नाही. परंतु मिथिला आणि राघव (ग्रेस यांची मुले) या बहिणभावंडाविषयी ग्रेस लिहिले असेल, तर तो संदर्भ घेऊन तत्संबंधी आकलन होऊ शकते, जसे प्रारंभीच या ओळींचा अन्वय सांगितला आहे. दुसऱ्या कडव्यातील 'तुझे', 'तुझी' ही सर्वनामे, तिसऱ्या कडव्यातील 'तुझे' सर्वनाम कोणाला उद्देशून आहेत? विदग्ध प्रतिमेप्रमाणे 'ऊन झेलु नको....' असे कवी कोणाला उद्देशून म्हणतो आहे? विदग्ध प्रतिमा कोणाची, विदग्ध प्रतिमा म्हणजे कोण? ....अमल दुःखाचा जोगवा कवी कोणाला मागतो आहे? ..... या प्रश्नांची उत्तरेही कविता देत नाही. त्यामुळे एकसंध आशयाची अनुभूती वाचकांना येत नाही. अन्वयार्थाची, संबद्धतेची धूसरता ही ग्रेस यांच्या कवितेची मर्यादा आहे. त्याला जी काही कारणे आहेत, त्यांपैकी दोन कारणांचा विचार या दोन कवितांबाबत करता येतो. वरील दोन्ही कवितांमध्ये शब्दविसर्जन आणि कालविसर्जन झाल्याचे दिसते.

'डोळे' कवितेत शब्दविसर्जन असल्यामुळे प्रथमदर्शनी ही कविता अन्वयहीन वाटते. तिचे संवादात्मक स्वरूप लक्षात येत नाही. कारण संवादाचे सूचन कवितेत नाही. एरवी शब्दांचे पिसेपण जडलेले ग्रेस 'डोळे' या कवितेत कवितेच्या संवादस्वरूपाचे कोणत्याच काव्यगत संकेताने सूचन करीत नाहीत. उलट, कवितेचे संवादरूप सूचित करण्यासाठी आवश्यक असलेल्या शब्दांचेच त्यांनी विसर्जन केले आहे. त्यामुळे कवितेचे संवादस्वरूप वाचकांनीच समजून घ्यावयाचे आहे. कसे समजून घ्यावयाचे आहे?....तर कवितेचा रूपबंध आणि अभिव्यक्तीमध्ये असलेला प्रेमभावनेचा, शृंगारभावनेचा परीघपरिसर वाचकांनीच समजून आकलन करून घ्यावचा आहे. तसा तो घेतला तरच 'डोळे' कवितेचा अन्वय लागतो; अन्यथा कविता अन्वयहीन किंवा दुर्बोध वाटते.

'दुपार' या कवितेत एका विशिष्ट ठरावीक पातळीवर कालविसर्जन झाले आहे. मैथिली, राघव, मृगतंद्री या प्रतिमा रामायणकाळाशी साहचर्य साधतात. कांचनमृगाच्या कथेचा आणि त्यानंतरच्या राम/राघव आणि सीतेच्या/मैथिलीच्या विरहाचा संबंध दूरान्वयाने प्रस्थापित होतो. कालविसर्जनामुळे रामायणात राम सीतेला शोधत होता पण; ग्रेस यांच्या या कवितेत सीताच/मैथिली राघवाला शोधते आहे, असे संसूचन होते. या कवितेत राघव, मैथिली, मृगतंद्री आणि खुद्द ग्रेस यांचे एक तिसरे जग आहे. कालविसर्जनामुळे या जगातील संदर्भ बदलतात म्हणून मैथिली राघवाला शोधते आहे. आणि हे कवी

राघवाला सांगतो आहे. या काव्यगत तिसऱ्या जगात राघव, मैथिली यांच्यासह ग्रेस रामायणकाळात वावरतात. या कडव्याचा पुढील दोन कडव्यांशी कसलाच सहसंबंध प्रस्थापित होत नाही. कारण पुन्हा ग्रेस स्ववर्तमानात, स्वतःच्या व्यक्तिगत जीवनात येतात आणि व्यक्तिगत दुःख कवितेत शब्दबद्ध करतात. शेवटचे कडवे पहिल्या दोन कडव्यांशी कसलाच अन्वय, साहचर्य साधत नाही; कारण या शेवटच्या चार ओळींमध्ये दुपारचे प्रत्ययकारी वर्णन येते, त्याचबरोबर कवीची दुःखजाणीवही व्यक्त होते. अन्वयहीनता, अर्थधूसरता या गोष्टी ग्रेस यांच्या कवितेला दुर्बोधतेकडे घेऊन जातात; पण कवितेतील देखण्या शब्दांतून योजिलेल्या परिचित पौराणिक प्रतिमा, निसर्गप्रतिमा, नादमय संगीताकर्षी यमकानुप्रासयुक्त लयबद्ध रचना यांमुळे कविता वाचकांना आवडते. सांध्यप्रेमी ग्रेस यांनी दुपारचे वर्णन प्रत्ययकारी केले आहे. ग्रेस यांच्या 'संध्याकाळच्या कविता' याच कवितासंग्रहात 'दुपारचे ऊन' ही कविता आहे. या कवितेतही दुपारचे वर्णन येते. वर उल्लेखिलेल्या 'दुपार' कवितेतील रंगप्रतिमा, निसर्गप्रतिमा, मृगजळ इत्यादी प्रतिमा त्या 'दुपारचे ऊन' या कवितेतही त्याच अर्थाने येतात. कवीचे एकाकीपण, दुःखप्रीती , भयजाणीव या संवेदना 'दुपार' आणि 'दुपारचे ऊन' या दोन्ही कवितांतून समान प्रतिमांतून समानार्थाने व्यक्त होतात. अशा समानार्थी प्रतिमांची पुनरावृत्ती ग्रेस यांच्या अनेक कवितांमधून येते. उदाहरण द्यायचे झाले, तर 'मरण' (चंद्र माधवीचे प्रदेश, पृष्ठ ७), आणि 'नर्तकी' (चंद्र माधवीचे प्रदेश, पृष्ठ २४) या दोन कवितांचे देता येईल.

**संदर्भटीपा :**

१. धुके आणि शिल्प : त्र्यं. वि. सरदेशमुख.
२. मृगजळाचे बांधकाम : ग्रेस
३. ग्रेसविषयी....: अक्षयकुमार काळे.
४. पार्थिवतेचे उदयास्त : द. भि. कुलकर्णी.
५. पु. शि. रेगे आणि ग्रेस यांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा : शिवाजी विद्यापीठात सादर केलेला अप्रकाशित शोधप्रबंध.

☆☆☆

# जैनेंद्रीय संज्ञा : एक तौलनिक अध्ययन

नीलेश जोशी

**प्रास्ताविक :**

संस्कृत साहित्यामध्ये व्याकरणशास्त्राला अग्रस्थानी मानले जाते. साधुशब्दांचे ज्ञान या शास्त्राद्वारे होत असते. हे व्याकरणशास्त्राचे महत्त्व जाणून त्याचा संबंध वेदांशी लावला गेला आणि षड्वेदांगांमध्ये व्याकरणाला स्थान मिळाले. एवढेच नव्हे, तर व्याकरणास वेदाचे मुख मानले आहे.

"वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम्[१]।"

तर महाभाष्यकार पतंजलींनी व्याकरणास 'अपरा विद्या' म्हणून संबोधले आहे.[२] त्यामुळेच सहाही वेदांमध्ये व्याकरणास प्रधान मानले जाते.[३] अशा या व्याकरणाचा मूळ संस्कर्ता म्हणून इंद्राचा उल्लेख तैत्तिरीय संहितेत आढळतो.

"ते देवा इन्द्रमब्रुवन्, इमां नो वाचं व्याकुर्विति।
तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत्।[४]"

यावरून स्पष्ट होते की, इंद्राने वाणीचे प्रकृति, प्रत्यय इत्यादी विभागांत विश्लेषण केले. इंद्राने चालविलेल्या या संप्रदायास 'ऐन्द्र संप्रदाय' म्हणून मान्यता मिळाली. याच्याशी अनेक प्राचीन प्रातिशाख्य ग्रंथ संबंधित होते. याचबरोबर समांतर असा दुसराही एक 'माहेश्वर संप्रदाय' होता. याच्याशी महर्षी पाणिनींचा संबंध असून 'अष्टाध्यायी' हा त्यांचा प्रसिद्ध व्याकरणग्रंथ माहेश्वर सूत्रांवर आधारभूत आहे, हे सर्वांना ठाऊकच आहे.

स्वतः महर्षी पाणिनींनी अष्टाध्यायीमध्ये पूर्ववर्ती १० वैयाकरण आचार्यांच्या मताचा नामनिर्देशपूर्वक स्वीकार केला. त्याच परंपरेनुसार पाणिनींनंतरच्या काळातही व्याकरण व त्याचे स्वरूप विकसित होत राहिले आणि अर्वाचीन व्याकरणग्रंथांवर पाणिनीय व्याकरणाचा स्पष्ट प्रभाव दिसतो, त्यामध्ये कातंत्र व्याकरण, चांद्रव्याकरण, जैनेंद्र व्याकरण, जैन शाकटायन व्याकरण, सरस्वतीकंठाभरण, हैमशब्दानुशासन सारस्वत व्याकरण, जौमर व्याकरण, मुग्धबोध व्याकरण यांचा समावेश होतो.

**जैनेंद्र व्याकरण :**

महर्षी पाणिनींनी कृत्रिम संज्ञांचा वापर करून व्याकरणशास्त्रात लाघव-गौरव प्रस्थापित करून सूत्ररचनेचा परमोत्कर्ष केला. याच परंपरेचे अनुकरण करीत उत्तरवर्ती जैनेंद्र व्याकरण असे एक व्याकरण आहे; ज्यामध्ये अनेक कृत्रिम संज्ञांचा मोठ्या प्रमाणात वापर केलेला आढळतो. म्हणून येथे तुलनेसाठी जैनेंद्रीय व्याकरणाचा स्वीकार केला आहे.

श्रवणबेळगोळच्या शिलालेखातील उल्लेखानुसार आचार्य देवनंदी किंवा पूज्यपाद जितेंद्रबुद्धी यांनी 'जैनेन्द्रव्याकरणम्' नामक व्याकरणाची रचना केली.[१] जिनेंद्रबुद्धी यांनी रचलेले व्याकरण म्हणून त्यास 'जैनेंद्र व्याकरण' म्हणतात.

**जैनेंद्र व्याकरणाचे उपलब्ध पाठ :**

या व्याकरणाचे आज दोन पाठभेद उपलब्ध होतात.

१) औचित्य लघुपाठ - अभयनंदीकृत 'महावृत्ति' सहित.

२) दाक्षिणात्य बृहत्पाठ - गुणनंदीकृत 'शब्दार्णव' सहित.

वरीलपैकी अभयनंदीकृत महावृत्तिसहित जैनेंद्र व्याकरणाचा लघुपाठ अधिक प्रामाणिक मानला जातो. येथे तुलना करताना आम्हीही हाच लघुपाठ स्वीकारलेला आहे. जैनेंद्रीय व्याकरणात अनेक कृत्रिम संज्ञा वापरल्या आहेत, त्यांवरील पाणिनीय व्याकरणाचा प्रभाव आणि काही नवीन संज्ञा या सर्वांचा अभ्यास करण्याचा मुख्य उद्देश आहे.

**जैनेंद्रीय संज्ञा :**

शास्त्रामध्ये काही विशिष्ट सांकेतिक अर्थाने जे

---

१. पा. शि. ४२

२. म. भाष्य १।२।३२

३. म. भाष्य १।१

४. तै. सं. ६।४।७।३

१. श्रवणबेळगोळ शिलालेख श्लो. क्र.





शब्द वापरले जातात, त्यांना 'संज्ञा' असे म्हणतात. त्यानुसार जैनेंद्र व्याकरणात या शास्त्राचे विशिष्ट संकेत सांगणाऱ्या संज्ञा वापरण्यात आलेल्या आहेत, त्या पुढीलप्रमाणे -

कोष्टक क्र. १

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| स्त्वम् | एप् | जि | इत् | अधिकरण | द्वि | स | कृत् |
| स्फ | दि | खम् | मु | कर्म | बहु | ह | व्य |
| ड. | नि | उप् | सु | कर्ता | विभक्ति | षम् | सत् |
| मृत् | भु | उज् | धि | गि | वा | य | हत् |
| प्र | त | उस् | रु | ति | इप् | र | द्रि |
| दी | खु | टि | गु | मम् | भा | बम् | थ |
| प | डि. | उड्. | पदम् | द | अप् | द्वन्द्व | च |
| उदात्त | ध | दु | भ | अस्मद् | का | द्यु | |
| अनुदात्त | संख्या | झि | अपादान | युष्मद् | ता | कि | एकूण |
| स्वरित | इल् | धु | संप्रदान | अन्य | इंप् | त्य | ८४ |
| ऐप् | सर्वनाम | धि | करण | एक | बोध्य | वाक् | |

अशा प्रकारे जैनेंद्र व्याकरणात एकूण ८४ संज्ञा योजण्यात आलेल्या आहेत. या संज्ञांचे चार विभागांत वर्गीकरण करता येते, ते असे -

१) स्वीकृत पाणिनीय संज्ञा

२) पाणिनीयतुल्य जैनेंद्रीय संज्ञा

३) केवळ जैनेंद्रीय संज्ञा

४) सविशेष जैनेंद्रीय संज्ञा

या चार प्रकारांमध्ये विभागणी करून जैनेंद्रीय संज्ञांचा तौलनिक अभ्यास करता येईल.

**१) स्वीकृत पाणिनीय संज्ञा -**

जैनेंद्रीय संज्ञांमध्ये अशा काही संज्ञा आढळतात, ज्या पाणिनीय व्याकरणातून जशाच्या तशा स्वीकारण्यात आलेल्या आहेत; पण त्यांचा अर्थबोध करवून देणारी संज्ञासूत्रे मात्र वेगळी आहेत. अशा संज्ञांना 'स्वीकृत पाणिनीय संज्ञा' अंतर्गत समाविष्ट केले आहे. अशा स्वीकृत पाणिनीय संज्ञा एकूण १९ आहेत. त्यांतील काही संज्ञा पुढे देत आहे.-

कोष्टक क्र.२

| अ.क्र | संज्ञा | जैनेंद्रीयसूत्र क्रम | पाणिनीयसूत्र क्रम |
|---|---|---|---|
| १ | उदात्त | जै.व्या.१।१।१३ | पा.सू.१।२।२९ |
| २ | अनुदात्त | जै.व्या.१।१।१३ | पा.सू.१।२।३० |
| ३ | स्वरित | जै.व्या.१।१।१४ | पा.सू.१।२।३१ |
| ४ | सर्वनाम | जै.व्या.१।१।३५ | पा.सू.१।१।२७ |
| ५ | टि | जै.व्या.१।१।६५ | पा.सू.१।१।६४ |
| ६ | पदम् | जै.व्या.१।२।१०३ | पा.सू.१।४।१४ |
| ७ | भ | जै.व्या.१।२।१०७ | पा.सू.१।४।१८ |
| ८ | अपादान | जै.व्या.१।२।११० | पा.सू.१।४।२४ |
| ९ | द्वन्द्व | जै.व्या.१।३।९२ | पा.सू.२।२।२९ |
| १० | कृत् | जै.व्या.२।१।८० | पा.सू.३।१।९३ |

येथे 'उदात्त'[१] या संज्ञेपासून 'विभक्ति'[२] या संज्ञेपर्यंतच्या १६ संज्ञा पाणिनीय व्याकरणातील पहिल्या अध्यायातून घेण्यात आलेल्या आहेत. शिवाय जैनेंद्र व्याकरणामध्ये या संज्ञा प्रथमअध्यायातच सांगितल्या आहेत. जैनेंद्र व्याकरणातील 'द्वन्द्व' ही एकच संज्ञा अशी आहे, जी समाजाचे रूढ नाम निर्देशित करते; अन्यथा तत्पुरुषादिक सर्व समासांना नवीन कृत्रिम संज्ञा देण्यात आलेल्या आहेत. तसेच जैनेंद्र व्याकरणातही 'कारके'[३] असे अधिकार-सूत्र करून पाणिनीय क्रमाने कारक-प्रकरण उक्त आहे. यावरून पाणिनीय व्याकरणाच्या प्रभावाचा अंदाज येऊ शकतो.

**२) पाणिनीयतुल्य जैनेंद्रीय संज्ञा -**

ज्या संज्ञा केवळ जैनेंद्रीय व्याकरणातच आहेत; पण त्यांचे कार्य मात्र पाणिनीय संज्ञांसारखे आहे, अशा संज्ञांचा विचार 'पाणिनीयतुल्य जैनेंद्रीय संज्ञा' या विभागात केला आहे. या संज्ञा जैनेंद्रीय व्याकरणाचे वैशिष्ट्य मानल्या जाऊ शकतात. या संज्ञांची एकूण संख्या ४७ आहे. येथे तुलनेसाठी काही संज्ञा उद्धृत करीत आहे-

---

१. जै. व्या. १।१।१३ - पा. सू. १।२।२९

२. जै. व्या. १।२।१५७ - पा. सू. १।४।१०४

३. जै. व्या. १।२।१०९ - पा. सू. १।४।२३










कोष्टक क्र.३

| अ.क्र. | जैनेंद्रीय संज्ञा | - | पाणिनीय संज्ञा |
|---|---|---|---|
| १ | स्त्रम् (जै.व्या. १।१।२) | - | सत्रर्णम् (पा.सू.१।१।९) |
| २ | स्फ(जै.व्या. १।१।३) | - | संयोगः (पा.सू.१।१।१७) |
| ३ | ड्.(जै.व्या. १।१।४) | - | अनुर्नासिकम् (पा.सू.१।१।८) |
| ४ | मृत्(जै.व्या. १।१।५) | - | प्रातिपदिकम्(पा.सू.१।२।४५) |
| ५ | प्र(जै.व्या. १।१।११) | - | न्हस्वः (पा.सू.१।२।२७) |
| ६ | नि(जै.व्या. १।१।२२) | - | निपातः (पा.सू.१।१।१४) |
| ७ | भु(जै.व्या. १।१।२७) | - | घु (पा.सू.१।१।२०) |

उपरोक्त संज्ञा आणि इतर जैनेंद्रीय संज्ञा या पाणिनीय संज्ञांहून भिन्न तर आहेतच; पण या संज्ञांचे खास वैशिष्ट्य म्हणजे या सर्व अल्पाक्षर आहेत. जैनेंद्र व्याकरणकारांनी सूत्रलाघवासाठीच इतक्या अल्पाक्षर संज्ञा बनविल्या आहेत, असेच यावरून म्हणावे लागेल. तसेच पाणिनीय संज्ञांमध्ये जेथे निपात-उपधा-धातु-गुरु-एकवचन- द्विवचन असे प्रयोग आहेत, तेथे काही अक्षरांचा लोप करून अनुक्रमे नि[१]-उङ्[२]-धु[३]-रु[४]-एक[५]-द्वि[६] अशा अल्पाक्षर संज्ञा बनविल्या आहेत. तरीही त्या जैनेंद्रीय संज्ञा म्हणून मान्यता पावण्यास योग्य आहेत.

### ३) केवळ जैनेंद्रीय संज्ञा -

ज्या संज्ञा केवळ जैनेंद्रीय व्याकरणातच आढळतात, पाणिनीय व्याकरणात आढळत नाहीत, अशा या संज्ञांचा समावेश 'केवळ जैनेंद्रीय संज्ञा' या प्रकारात केला आहे. अशा एकूण ४ संज्ञा आहेत. -

| अ.क्र. | जैनेंद्रीय संज्ञा | प्रसिद्ध अर्थ |
|---|---|---|
| १ | खु (जै.व्या. १।१।२९) | संज्ञा |
| २ | डि. (जै.व्या. १।१।३०) | भावकर्म |
| ३ | धि (जै.व्या. १।२।२) | अकर्मक धातू |
| ४ | द्यु (जै.व्या. १।३।१०५) | उत्तरपद |

१ जै. व्या. १।१।२२ - पा. सू. १।१।१४

२ जै. व्या. १।१।६६ - पा. सू. १।१।६५

३ जै. व्या. १।२।१ - पा. सू. १।३।१

४ जै. व्या. १।२।१०० - पा. सू. १।४।११

५ जै. व्या. १।२।१५५ - पा. सू. १।४।१०२

६ जै. व्या. १।२।१५५ - पा. सू. १।४।१०२

वरील चारही संज्ञा पाणिनीय व्याकरणात आढळत नाहीत, हे स्पष्ट आहेच, त्यामुळे या संज्ञा जैनेंद्रीय व्याकरणाचे वैशिष्ट्य असून या कृत्रिम संज्ञांमुळे सूत्रलाघव घडला आहे. उदा.- डै.ा । जै.व्या.१।२।७ या सूत्राने 'डि.' पुढे असताना म्हणजे भावे व कर्मणी प्रयोगात प्रयोगात 'द' म्हणजे आत्मनेपदी प्रत्यय होतात. हे सूत्र भावकर्मणीः । पा.सू.१।३।१३ सूत्राशी तुल्य आहे. तरी जैनेंद्रीय सूत्र अधिक लघुतम हे मानावेच लागेल.

### ४) सविशेष जैनेंद्रीय संज्ञा -

जैनेंद्रीय व्याकरणकारांनी व्याकरणशास्त्रात रूढ असलेल्या शब्दांनादेखील कृत्रिम संज्ञा दिल्या आहेत. त्यांना 'सविशेष जैनेंद्रीय संज्ञा' म्हटले आहे. या संज्ञांचे दोन उपप्रकार पडतात.

१) सामासिक संज्ञा

२) विभक्तिक संज्ञा

यांची उदाहरणे पुढीलप्रमाणे -

### ४.१) सामासिक संज्ञा -

कोष्टक क्र.५

| अ.क्र | जैनेंद्रीय संज्ञा | - | पाणिनीय संज्ञा |
|---|---|---|---|
| १ | स (जै.व्या.१।३।२) | - | समास (पा.सू.२।१।३) |
| २ | ह (जै.व्या.१।३।४) | - | अव्ययीभाव (पा.सू.२।१।३) |
| ३ | षम् (जै.व्या.१।३।१९) | - | तत्पुरुष (पा.सू.२।१।२२) |
| ४ | य (जै.व्या.१।३।४४ | - | कर्मधारय (पा.सू.१।२।४२) |
| ५ | र (जै.व्या.१।३।४७) | - | द्विगु (पा.सू.२।१।५२) |
| ६ | बम् (जै.व्या.१।३।८६) | - | बहुव्रीही (पा.सू.२।२।२४) |

### ४.२) विभक्तिक संज्ञा -

कोष्टक क्र.६

| अ. क्र | जैनेंद्रीय संज्ञा | प्रसिद्ध अर्थ |
|---|---|---|
| १ | वा (जै.व्या.१।२।१५८) | प्रथमा |
| २ | इप् (जै.व्या.१।२।१५८) | द्वितीया |
| ३ | भा (जै.व्या.१।२।१५८) | तृतीया |
| ४ | अप्(जै.व्या.१।२।१५८) | चतुर्थी |
| ५ | का (जै.व्या.१।२।१५८) | पंचमी |
| ६ | ता (जै.व्या.१।२।१५८) | षष्ठी |
| ७ | ईप् (जै.व्या.१।२।१५८) | सप्तमी |
| ८ | बोध्य (जै.व्या.१।२।१५८) | संबोधन |

अनुक्रमणिका





येथे स्पष्ट होते की, सामासिक संज्ञांमध्ये सर्व समासांना संज्ञा तर दिलेल्या आहेतच; पण 'समास' या शब्दासही संज्ञा दिली आहे. सूत्रलाघव हेच कारण समोर येते. उदा.- अव्ययीभावे शरत्प्रभृतिभ्यः। पा.सू.५५।४।१०७ या पाणिनीय सूत्राच्या तुलनेत हे शरदादेः। जै.व्या. ४।२।१०९ हे जैनेंद्रीय सूत्र अल्पाक्षर आहे. हीच गोष्ट विभक्तींबाबतदेखील म्हणावी लागेल. उदा.- पञ्चमी भयेन। पा.सू.२।१।३७ या पाणिनीय सूत्रापेक्षा का भीभिः। जै. व्या. १।३।३२ जैनेंद्रीय सूत्र अधिक लहान आहे.

**संज्ञाकरणाचा परिणाम -**

पूर्वी स्पष्ट केल्याप्रमाणे जैनेंद्रीय व्याकरणात ८४ संज्ञा वापरण्यात आलेल्या आहेत. या संज्ञाकरणाचा परिणाम असा की, सूत्रामध्ये मोठ्या प्रमाणात लघुता आलेली आहे. त्यामुळे जैनेंद्रीय व्याकरण पाणिनीय रचनेपेक्षा कमी प्रयासात कंठस्थ करता येईल, हे नक्की.

दुसरा परिणाम हा मात्र दुष्परिणाम वाटतो. कारण जैनेंद्रीय व्याकरणात रूढ शब्दांनादेखील संज्ञा योजल्यामुळे अर्थसंदिग्धता निर्माण होते. अल्पाक्षरत्व, सारवत्त्व, विश्वतोमुख, अस्तोभत्व, अनवद्यत्व ही पाचही सूत्रलक्षणे जैनेंदीय व्याकरणास तंतोतंत लागू पडतात. पण असंदिग्धता मात्र नाही; कारण अत्यंत अल्पाक्षर कृत्रिम संज्ञा वापरल्या आहेत. उदा., भुस्थोः। जै.व्या.१।१।९१ या सूत्रात 'भु' ही कृत्रिम संज्ञा आहे; पण 'स्था' धातूच्या सान्निध्यात उच्चारल्यामुळे तो धातू वाटण्याची शक्यता आहे. किंवा चात्। जै. व्या. ५।२।६० या सूत्रात च+आत् असा विग्रह असून येथे 'च' हे अव्यय नसून अभ्यस्त संज्ञा आहे, त्यामुळे येथे संदेह निर्माण होतो. अशी अनेक उदाहरणे देता येतील, पण विस्तारभयास्तव येथेच विराम घेऊ.

**सारांश -**

थोडक्यात असे सांगता येईल की, जैनेंद्रीय व्याकरणात स्वीकृत पाणिनीयसंज्ञा १९, पाणिनीयतुल्य जैनेंद्रीय संज्ञा ४७. केवळ जैनेंद्रीय संज्ञा ०४, सविशेष जैनेंद्रीय संज्ञा १४ अशा एकूण ८४ संज्ञा योजण्यात आलेल्या आहेत. या संज्ञा खूपच अल्पाक्षर आहेत. त्यामुळे सूत्रे लघुतम झाली; पण अर्थाच्या बाबतीत मात्र संदिग्धता निर्माण होते. तरीसुद्धा जैनेंद्रीय व्याकरण पाणिनीय व्याकरणाच्या प्रभावाने युक्त असूनही स्वतंत्र आहेच. शिवाय जैनेंद्रीय संज्ञा मुखोद्गत झाल्याशिवाय जैनेंद्रीय व्याकरणाचा श्रीगणेशाच होऊ शकत नाही, हे नक्की.

**संदर्भसूची ग्रंथ -**

१) जैनेन्द्रव्याकरणम्, आचार्य - अभयनन्दिप्रणीता जैनेन्द्रमहावृत्तिः, सम्पादक : पं.शम्भुनाथ त्रिपाठी, पं. महादेव चतुर्वेदी, प्रकाशक : भारतीय ज्ञानपीठ, काशी, नोव्हेंबर १९५६

२) अष्टाध्यायी, परच्छेदवृत्तिवार्त्तिकटिप्पणीसहिता, सम्पादक : श्रीगोपालदत्त पांडेय, प्रकाशक : चोखंबा सुरभारती प्रकाशन, वाराणसी, सन २००८

३) "Ashtadhyayi of Panini" edited & transleted into English, by Vasu S.C., Vol-I & II, Publication - Motilal Banarasidas, Delhi, 1962

४) व्याकरण महाभाष्य, मूळ व मराठी भाषांतर, भाषांतरकार म.म.वासुदेवशास्त्री अभ्यंकर, संपादक - का.वा.अभ्यंकर, प्रकाशक - डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणे - १९५१-१९५३, भाग- १-६

५) पाणिनीय शिक्षा, विस्तृत हिंदी व्याख्या सहित, संपादक : विद्यासागर डॉ.दामोदर महतो, प्रकाशक : मोतीलाल बनारसी दास, दिल्ली, २००२

☆☆☆








# कुसुमाग्रजांच्या पुतळाविषयक कविता : एक चिंतन

प्रा.संग्राम थोरात

भारतीय साहित्यक्षेत्रातील सर्वोच्च मानला जाणारा ज्ञानपीठ पुरस्कार मिळविणारे वि.स.खांडेकर, वि.वा.शिरवाडकर व विंदा करंदीकर या तिघांच्या लेखनाचा समान धागा म्हणजे सामाजिक व मानवतावादी विचार; तसेच त्यांच्यावर म.गांधींच्या विचारांचा असणारा प्रभाव हा होय. भाऊसाहेब खांडेकरांनी ज्ञानपीठ पुरस्कार स्वीकारताना पुढे हा पुरस्कार शिरवाडकरांना मिळेल, असे भाकीत केले होते. आणि ते खरेही ठरले. विशाखा हा कुसुमाग्रजांचा कवितासंग्रह खांडेकरांनी स्वखर्चाने प्रकाशित केला व त्याला प्रस्तावनाही लिहिली. कुसुमाग्रजांच्या प्रतिभेबद्दल प्रस्तावनेत खांडेकर म्हणतात, "कुसुमाग्रज आपल्या कवितांना रूक्ष समिधा म्हणून संबोधतात; पण मला वाटते, त्यांच्या प्रतिभेला उपमा द्यायचीच असली, तर ती शमीवृक्षाची देता येईल. त्या वृक्षाप्रमाणे तिच्या अंतरंगात दाहक अग्नी तर आहेच, पण अज्ञातवासातून मुक्त होताना शमीवृक्षाने पांडवांना त्यांची शस्त्रे जशी अधिक तेजस्वी करून दिली, त्याप्रमाणे विषमता, पिळणूक, गांजणूक आणि अन्याय यांच्याविषयीची बहुजन समाजाची चीड कुसुमाग्रजांनी अत्यंत उत्कट आणि सुंदर स्वरूपांत आपल्या काव्यातून व्यक्त केली आहे."[१] ही सामाजिक जाणीव त्यांच्या पुढील काव्यातूनही अधिक विस्तारित झालेली आहे.

सामाजिकता हा कुसुमाग्रजांच्या काव्याचा गाभा आहे. त्यांना दिसलेले सामाजिक वास्तव विद्रूप होते. या भयानक वास्तवातूनच त्यांच्या संवेदनशील मनाने सामाजिक भान जपले. त्यांची कविता समाजाला विजिगीषू वृत्ती, ध्येयवादी वृत्ती आणि क्रांतिप्रवण मनोवृत्ती यांची जाणीव करून देते. समाजाचे अध:पतन, नीतिमूल्यांचे अवमूल्यन, माणुसकीचा ऱ्हास, ओंगळ राजकारण, महात्म्यांच्या विचारांची पायमल्ली या सर्व घटना त्यांना अस्वस्थ करीत असत. कुसुमाग्रजांच्या कवितेविषयी खांडेकर म्हणतात, "आजच्या सामाजिक जीवनातल्या अश्रू, असंतोष, चीड, त्वेष, इ.साऱ्या गोष्टी कुसुमाग्रजांच्या कवितेत आढळतात. पण या सर्वांचे नुसते चित्रण करून ते थांबत नाहीत. त्यांचे अश्रू दुबळे नाहीत. त्यातून दुर्दम्य आशावादाच्या ठिणग्या उडत आहेत."[२] वरील उद्‌गारांतून त्यांच्या सामाजिक जाणिवेच्या कवितेचे यथार्थ स्वरूप स्पष्ट होते. अशी पार्श्वभूमी कुसुमाग्रजांच्या सामाजिक कवितांच्या केंद्रस्थानी असल्याने त्यांच्या कवितेत स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या जीवनमूल्यांचे चिरंतन दर्शन घडते. त्यामुळेच सामाजिक विषमतेविरुद्ध तीव्र संघर्षाची भूमिका मांडणारा मानवतावादी कवी म्हणून या कवीकडे पाहिले जाते.

कुसुमाग्रजांनी सामाजिक कवितेतून अनेक विषयांना व ज्वलंत प्रश्नांना स्पर्श केला आहे. समाजात घडणारी प्रत्येक चांगली-वाईट घटना त्यांना अस्वस्थ करीत होती. त्यामुळेच त्यांच्या काव्यप्रभावातून 'अग्निसंप्रदाय' नावाचा एक संप्रदाय त्या काळी जन्माला आला. या संप्रदायाने मराठी मनावर वेगळे संस्कार केले. प्रस्तुत संप्रदाय म्हणजे त्यांच्या सामाजिक कवितेचे फलित आहे. अभ्यासकांना तर कुसुमाग्रजांची सामाजिक कविता केशवसुतांच्या कवितेचे पुढचे पाऊल वाटते. "कुसुमाग्रजांची सामाजिक कविता अर्थातच केशवसुतांच्या सामाजिक कवितेच्या फार पुढे गेलेली कविता आहे. कारण केवळ सामाजिक जाणीव व्यक्त करून कुसुमाग्रज थांबत नाहीत; ते समाजमनाचे सादपडसाद टिपतात. सामाजिक विचारांबाबतच्या समाजपुरुषांच्या व्यथावेदनांची चित्रे काढण्याची कुसुमाग्रजांच्या प्रतिभेला आरंभापासूनच सवय आहे. जनसामान्यांच्या मनात जे हेलावत असते, सामान्य जनतेच्या संज्ञेभोवती जे घोटाळत असते, ते विचारवास्तव कुसुमाग्रजांच्या कवितेत अनेक वेळा एक भेदक, खोचक काव्यरूप घेऊन येते आणि त्यामुळेच त्यांची सामाजिक आशयाची कविता म्हणजे कधीकधी समाजमनाचा एकवटलेला तिखट उद्‌गार अशा स्वरूपाची होते"[३]

अनुक्रमणिका

कुसुमाग्रजांच्या समग्र कवितांतील पुतळाविषयक कविताही असाच समाजमनाचा एकवटलेला तिखट उद्‌गार व्यक्त करतात; तसेच आत्मचिंतन करायला भाग पाडतात.

**कुसुमाग्रजांच्या पुतळाविषयक कविता**

कुसुमाग्रजांनी या विषयास अनुसरून काव्यलेखन करून आपल्या मनीची खंत व्यक्त केली आहे. खरेतर पूर्वजांचे स्मरण म्हणून थडगी उभी करणे, स्मारके बांधणे ही आपली ग्रामीण संस्कृती आहे. शिवारात किंवा घराच्या परसदारी आजी-आजोबांचे थडगे उभारल्याने त्यांचे अस्तित्व जुन्या लोकांना जाणवायचे. वर्षश्राद्धाच्या दिवशी त्यांच्या स्मृतींना उजाळा मिळायचा. कुटुंबातील सर्वजण नैवेद्य दाखविण्याच्या निमित्ताने पूर्वजांच्या थडग्याजवळ एकत्र जमायचे. पूर्वजांचे गुण आठवून त्यांच्या व्यक्तित्वाला उजाळा दिला जायचा. ज्याच्या घरी आर्थिक सुबत्ता आहे, तो स्मारकाच्या रूपाने पूर्वजांच्या स्मृतींचे जतन करू लागला. परंतु जसजसा माणूस सुशिक्षित होऊ लागला, तसतसा तो भावशून्य होऊ लागला. आजतर तो हयात व्यक्तींना सांभाळत नाही; मग पूर्वजांच्या स्मृतींचे तर सोडूनच द्या! हे झाले ग्रामीण भागातील लोकांचे. याउलट, शहरी लोकांची तऱ्हा आहे. शहरात रस्तोरस्ती व चौकाचौकांत महापुरुषांचे पुतळे उभे केले गेले. पाश्चात्त्यांच्या अनुकरणातून आपण थोर माणसांचे पुतळे उभे करू लागलो. त्या काळी यापाठीमागचा हेतूही शुद्ध होता. त्यांच्या ऋणातून व शिकवणुकीतून उतराई होण्याचा तो एक मार्ग होता. पण पुढे मात्र त्याला ओंगळ स्वरूप प्राप्त झाले. चौकाचौकांतील पुतळ्यांच्या विटंबना होऊ लागल्या. जात, धर्म, पंथ, संप्रदाय यांचे साचे तयार करून त्या साच्यांत या महामानवांना बंद करणे चालू झाले. सर्वच महामानवांना आपण संकुचित बनविले. आपल्या देशातील कोणत्या ना कोणत्या शहरात दरवर्षी एकातरी पुतळ्याची विटंबना होताना दिसते. अशा घटनांनी मन विषण्ण होते.

कविवर्य कुसुमाग्रजांच्या 'जीवन लहरी' ते 'मारवा' अशा तेरा कवितासंग्रहांतून मला मिळालेल्या पुतळाविषयक कविता या लेखात घेतलेल्या असून, कवीची स्वातंत्र्यपूर्व काळातील पुतळाविषयक जाणीव व स्वातंत्र्योत्तर काळातील पुतळाविषयक जाणीव अशा दोन भागांत माझे चिंतन मांडण्याचा मी प्रयत्न केला आहे. महापुरुषांच्या विचारांचा आपण पराभव करीत आहोत, अशी खंत या विषयावरील प्रत्येक कवितेतून व्यक्त होताना दिसते.

१

'जीवन लहरी' (१९३३) व विशाखा (१९४२) हे कुसुमाग्रजांचे दोन कवितासंग्रह स्वातंत्र्यपूर्व काळातील आहेत. या काळातील कवीची प्रारंभीची पुतळाविषयक कविता असहायता व अगतिकता व्यक्त करताना दिसते. उदाहरणच घ्यायचे झाल्यास ४४ क्रमांकाच्या जीवन लहरीत कवी म्हणतात,

'कोण तुम्हा गाइल हो
अभिषेकिल अश्रुजले
थडग्यांवर ना तुमच्या
पडतिल ती कीर्तिफुले'[४]

कुसुमाग्रजांची प्रारंभीची कविता ही अशा प्रकारची जळजळीत वास्तवता समाजापुढे मांडते. कित्येकांच्या झिजण्यातून, राबण्यातून, त्यागातून व समर्पणातून आपणाला स्वातंत्र्य व समताधिष्ठित समाजव्यवस्था मिळाली; पण आपण हे सहजपणे विसरलो आहोत. ज्यांच्या मरणातून आम्हाला जीवन मिळाले त्यांना आम्ही थडग्यांत व पुतळ्यांत बंद केले, अशी खंत प्रस्तुत जीवन लहरीतून व्यक्त होते. समाजपुरुषांचे जगणे आणि मरणेही ज्या वेळी 'अज्ञात' राहते, त्या वेळी समाज त्यांच्या विचारांची किती अवहेलना करतो, याचे प्रत्यंतर कवितेतून घडते. तत्कालीन समाजानेही याकडे दुर्लक्षच केल्याचे दिसते. त्या थडग्यांतील वीरांना आपण विसरलो, असे दु:ख कवितेतून व्यक्त होते.

कुसुमाग्रजांचा स्वातंत्र्यपूर्व काळातील दुसरा कवितासंग्रह म्हणजे 'विशाखा'. या संग्रहातील 'टिळकांच्या पुतळ्याजवळ' ही कवीची पुतळाविषयक कविता आत्मचिंतन करायला लावणारी कविता आहे. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे....' असे आत्मविश्वासाने सांगणारे लोकमान्य टिळक व त्यांचे कर्तृत्व यांचा विसर समाजाला पडतो', तेव्हा ही कविता प्रेरणादायी ठरते. निराशेने काळवंडलेल्या कवीच्या मनाला या पुतळ्याच्या दर्शनाने पुन्ही उभारी येते. त्यांचा उत्साह वाढतो. टिळकांची

मूर्ती त्यांना डोंगराएवढी मोठी वाटते. कवी म्हणतात,

'ती कणखर मूर्ती धीट मराठी थाट
आदळतो जीवर अजून पश्चिम-वात,
ती अजिक्य छाती ताठर अन् रणशील
जी पाहून सागर थबके, परते आत!'[५]

असे ओजस्वी जीवन व 'अजिंक्य छाती' पाहून सागरही थबकतो, अशी प्रतीकात्मक शब्दयोजना करणारे कुसुमाग्रज टिळकांच्या विचारांना पुन्हा आठवावे, असे जणू आवाहन करतात. त्यांची कणखर धीट मूर्ती व मराठी (महाराष्ट्रीयन) थाट पुन्हा एकदा मराठी अस्मिता उभी करेल, असे कवीला वाटले असावे. 'भारतीय असंतोषाचे जनक' असणाऱ्या टिळकांचा आपण पुतळा उभारला आणि आपले काम झाले, असे आपण समजतो. स्वातंत्र्यासाठी झटणाऱ्या अशा थोर माणसांना आपण हृदयमंदिरात ठेवायला पाहिजे व त्यांचे विचार आत्मसात करून देश 'महासत्ता' कसा बनेल, याचा विचार करायला पाहिजे. स्वातंत्र्यासाठी अस्वस्थ होणाऱ्या टिळकांचे व्यक्तिमत्त्व विसरून कसे चालेल? निराशेने काळवंडलेल्या कविमनाला जर पुतळारूपी टिळकांच्या दर्शनाने उभारी येत असेल, तर भारतीय नागरिक असणाऱ्या इतरांना त्याची अनुभूती का येऊ नये? असे म्हणावेसे वाटते.

अशा प्रकारे कुसुमाग्रजांच्या स्वातंत्र्यपूर्व काळातील कवितेतून प्रारंभी जरी अगतिकता जाणवली, तरी 'टिळकांच्या पुतळयाजवळ' या कवितेतून समाजाची पुतळ्याकडे पाहण्याची दृष्टी कशी असावी, त्याच्यापासून स्फूर्ती कशी घ्यावी, पुतळ्याप्रती आदर कसा व्यक्त करावा, याचा उत्तम नमुना लोकांपुढे ठेवला आहे. कवीची पुतळाविषयक जाणीव तर येथे बदलतेच; शिवाय आपल्या सांसारिक दुःखांनी व काळज्यांनी जर्जर झालेल्या तरुण कवीने भव्य पुतळ्यापासून जशी प्रेरणा घेतली, तशी प्रचिती सर्वांना यावी व समाजानेही यातून प्रेरणा घ्यावी, असे मनोमन वाटते.

२

स्वातंत्र्योत्तर कालखंडात कुसुमाग्रजांचे सुरुवातीच्या काळात किनारा (१९५२), मराठी माती (१९६०), स्वगत (१९६२) व हिमरेषा (१९६४) हे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. स्वातंत्र्योत्तर काळातील 'किनारा' हा पहिला कवितासंग्रह असल्याने या संग्रहातील बहुतांश कविता स्वातंत्र्याची आस लागलेल्या व काही कविता स्वातंत्र्याचा आनंदोत्सव मांडणाऱ्या आहेत. संग्रहातील 'चौपाटीवर' (क्र.५७) ही कविता पुतळाविषयक कविता आहे. स्वातंत्र्योत्तर काळातच खऱ्या अर्थाने 'पुतळा संस्कृती' फोफावली. यानंतरच्या कुसुमाग्रजांच्या बहुधा प्रत्येक संग्रहातून त्यांनी हा विषय हाताळला आहे. कुसुमाग्रजांनी १९४३ मध्ये 'चौपाटीवर' ही कविता लिहिलेली आहे. या संग्रहातील प्रत्येक कवितेवर 'विशाखा'ची छाप दिसून येते. कारण चौपाटीवर उभा असणारा शूराचा पुतळा (किनारा) व सागरकिनारी असणारा टिळकांचा पुतळा (विशाखा) यांच्यात स्थळाचे साम्य आहे. दर्याकिनारी डौलाने उभा असणारा शूरवीराचा पुतळा त्याच्यावर होणाऱ्या पाश्चात्त्य विचारांच्या आघाताने थरथरतो, तेव्हा कुसुमाग्रज म्हणतात, 'पश्चिमवारा फुलवित जीवन जगतावर आला, आज पहाटे त्या शूराचा पुतळा थरथरला!'[६] स्वातंत्र्याचे दिव्य स्वप्न उराशी बाळगणारा हा अनामवीर; स्वातंत्र्यासाठी आपले अखंड आयुष्य खर्च करतो. ते स्वातंत्र्य त्याला दृष्टीपथात आल्यासारखे वाटते, त्या वेळी त्याची समरशील छाती अभिमानाने पुलकित होते. त्याच्या हृदयातून 'वंदे मातरम्' हा महामंत्र पुन्हा ओठावर येतो. ह्या सर्व आंतरिक चैतन्यामुळे तो अंतर्बाह्य पेटून उठतो आणि त्यामुळेच त्या शूराचा पुतळा थरथरतो. भारताच्या स्वातंत्र्यासाठी आपले पूर्ण आयुष्य धगधगत्या यज्ञकुंडात सर्मपित करणाऱ्या ह्या वीराला पाश्चात्त्य विचारांच्या आघातामुळे असह्य वेदना होतात. या दुःखाने व वेदनेने त्याचा पुतळा थरथरतो. या शूराला पुतळ्यात बंद करूनही त्याचा आवेश, जोश कमी झालेला नाही. त्याचा निदान आम्ही पुतळा तरी उभारला, पण 'अनामिकास' या कवितेतील जवानाला आम्ही विसरलो आहोत. म्हणूनच कवी म्हणतात, 'अनामवीरा जिथे जाहला तुझा जीवनान्त, स्तंभ तिथे ना कुणी बांधला, पेटली न वात!' (किनारा, पृ.११९) देशासाठी आपल्या संसाराची व जीवनाची राखरांगोळी करणारा वीर आणि त्याचे बलिदान आत्मकेंद्रित झालेल्या समाजास आठवतही नाही. त्यासाठी कवी मात्र आपला पहिला प्रणाम त्या अनामिक मृत्युंजय वीरासच करतो. अशा शेकडो अनाम

वीरांना आपला पहिला मुजरा करून कवीने समाजास त्यांची आठवण करून दिली आहे. कुसुमाग्रजांच्या १९६० साली प्रसिद्ध झालेल्या 'मराठी माती' या संग्रहात एकूण ७२ कविता आहेत. स्वतंत्र महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीचे साल व त्याच सालात प्रसिद्ध झालेला कुसुमाग्रजांचा कवितासंग्रह; त्यामुळे महाराष्ट्राचा गौरव कवितेतून दिसून येतो या संग्रहातील 'करा दूर जरा हात—' या कवितेतून कवीने समाजासाठी झिजलेल्या, राबलेल्या व्यक्तींविषयी कृतज्ञतापूर्वक वंदन करताच कवीच्या नजरेसमोर त्याच्या जगण्याचे चित्र उभे राहते. त्याने चालायला सुरुवात करताच लक्षावधी लोक त्याच्या मागून जातात; त्याच्या स्पर्शाने तिमीरही तेज:पूंज होते; त्याचे बोलणेही वेदोक्तऋचे समान आहे. असा हा तेजस्वी, ज्ञानी, सामाजिक कळवळा असणारा प्रेमळ व ऋषितुल्य साधूपुरूष असूनही समाजातील प्रेमाचा झरा आटल्याने त्याला आपण समाधीत बंद केले; त्याच्या प्रेमाची, विचारांची अवहेलनाच केली, अशी खंत कवितेतून व्यक्त होते. 'करा दूर जरा हात, दयामय प्रीतिमय, करा दृष्टि दूर जरा, स्नेहमय शांतिमय'[७]

भारतीय संस्कृतीत असे अनेक ऋषी (विश्वामित्र, वशिष्ठ, याज्ञवल्क्य), असे अनेक अवतार (राम, कृष्ण, बुद्ध, महावीर, गुरूनानक, पैगंबर) तसेच अनेक संत, समाजसुधारक, विचारवंत होऊन गेले; पण समाजाने त्यांना साचेबंद केले; या सर्वांना जाति-धर्मात अडकवून ठेवले, त्यामुळे या युगप्रवर्तक पुरुषांचे जीवन कृतार्थ होण्यापेक्षा आपण त्यांना दु:खच दिले, हे वास्तव कवी येथे मांडतात; तर 'स्वगत' या संग्रहातील 'शिवाजी' ही कविता आपण पुतळासंस्कृतीच्या किती आहारी गेलो आहोत, याचे सार्थ दर्शन घडविते. शिवरायांनी केलेले अलौकिक कार्य आपण विसरतो. तोही एक हाडा-मांसाचा माणूसच होता हे विसरून त्याला देवत्व बहाल करून त्याच्या पूजनात दंग होतो. महाराष्ट्राच्या मातीवर व मराठी माणसाच्या छातीवर 'शिवाजी' हे नाव कोरलेले असल्याने त्यांचे नाव ऐकताच कवीचे हातही यांत्रिकपणे जुळतात. पण आम्ही त्यांचे कर्तृत्व पुस्तकात व पुतळ्यात बंद केल्याचे सांगताना कुसुमाग्रज म्हणतात,

'पाठ्यपुस्तकामधून रचली
नवरस भरूनी तुझी कहाणी
दिले उभारूनी पुतळे सुंदर
शिवेशिवेवरी नगरोद्यानी,
सभागृहांतून –
तव महिम्याची रुणझुणती ती
वाद्यगणाच्या साथीवरती
सुस्वर गाणी'[८]

महाराष्ट्रातील अनेक शहरांतून छ.शिवरायांचा पुतळा ऊन, वारा, पाऊस व स्वयंघोषित मावळ्यांचे (?) जयजयकार सहन करीत उभा आहे. कवीने अशा पुतळ्यांना उपहासाने 'संगमरवरी प्रतिमा' असा शब्द वापरला आहे.

'स्वराज्य व्हावे ही श्रींची इच्छा', असा उद्घोष करीत काळावरती अधिराज्य गाजविणाऱ्या शिवरायांची व त्यांच्या कार्याची होणारी अवहेलना पाहून कवींना राजा दशरथ, श्रीकृष्ण, सिद्धार्थ, संत ज्ञानेश्वर यांची जी अवहेलना झाली ती आठवते. त्यामुळे कवीला देवदेवळे, पुतळे, मूर्ती या गोष्टी नकोशा वाटतात. त्यांच्या जीवनातील जिवंत शिकवण मिळावी, ही इच्छा कवितेतून व्यक्त होते व शिवरायांना पुन्हा अवतीर्ण होण्याचे असे आवाहन येते. 'ये गीतांतुन, ये ग्रंथांतुन, मंदिरांतुनी ये रस्त्यावर, उद्यानांतील शिल्पामधुनी, ये माळावर' (स्वगत, पृ.९) कवीची ही इच्छा पूर्ण झाल्यास बालकांत बालशिवाजी, युवकांत योद्धा शिवाजी व वृद्धांत राजा शिवाजी नक्की दिसेल, यात शंका नाही. 'जय भवानी जय शिवाजी' व 'छ.शिवाजी महाराज की जय' असा वर्षातून तीन वेळा (तीन जयंत्या) जयघोष करणाऱ्या महाराष्ट्राला त्यांच्या प्रभावाची जाणीव करून देताना 'आग्र्याच्या किल्ल्यांत' या कवितेत कवी म्हणतात, 'तेथील संगमरवरी चिऱ्यांत अजूनही छ.शिवरायांचे शौर्य कोरून ठेवलेले आहे. याची ओळख महाराष्ट्राने ठेवावी ही विनंती आहे.' परंतु नेमकी ही ओळखच महाराष्ट्र विसरला आहे. शिवरायांनी उभारलेले हिंदवी स्वराज्य फक्त मराठा समाजातील लोकांसाठी नक्कीच नव्हते, पण आज मात्र बहुतांशी फक्त हाच समाज त्यांचा जयघोष करताना दिसतो, तेव्हा आपण शिवरायांना किती संकुचित बनविले

याचेच दर्शन घडते. यातही बहुतांशी राजकीय पुढारीच आपल्या स्वार्थासाठी त्यांच्या नावाचा वापर करताना दिसतात.

आपल्या अलौकिक कार्याने काळावर छाप पाडणाऱ्या युगपुरुषांचे कुसुमाग्रजांना नेहमीच आकर्षण होते. त्यांचे प्रेरणादायी विचार कालातीत असल्याने नेहमीच मार्गदर्शक ठरतात. अशा महनीय व्यक्तींचे कार्य, त्यांचे निरपेक्ष व निराकांक्ष जीवन विसरणे म्हणजे जणू पातकच आहे. 'हिमरेषा' संग्रहातील 'विवेकानंद' या कवितेतून कविमन स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वाकडे खेचले गेले आहे. संसाररूपी धोपटमार्गावर युगानयुगे चालणारा गृहस्थ ज्या वेळी थकतो, वर्षानुवर्षं पिकांना व तृणपात्यांना आपल्या कुशीत सामावून घेणारी माती वांझ होते, तेजावर परंपरेच्या काजळीचे लिंपण चढते, प्रकाशाच्या ज्योती 'विझू विझू' होतात, मन मारून जिवंत राहणारा माणूस, आकाशातील ताऱ्यांचे तारेपण संपते, बधिर झालेल्या अंध जाणिवा अंधारात भ्रमिष्ट होतात, संस्कृतीच्या जीवनधारा भुताटकीने झाकोळून जातात अशा सामाजिक, सांस्कृतिक अध:पतनानंतर कोणीतरी 'परित्राणाय साधूनां' प्रमाणे जन्म घेतो.-

'अदृश्यांतुनी ईश्वरतेचा
हात दयामय पुढती येतो
मृत मातीवर अलौकिकाचे करण्या सिंचन
वांझपणांतुनी फुलवायास्तव नवीन जीवन
नव्या प्रकाशी जागृत करण्या मेलेले मन
रूप असे हे—
शब्द असा हा—
तेज असे हे जगास येतो'[४]

'धर्मसंस्थापनार्थाय' आलेल्या अशा महामानवांना आपण आभाळाएवढे मोठे करतो आणि आपण मात्र 'कोते' च राहतो. स्वामीजींनाही त्यांच्या विचारासह आम्ही मोठे ठरविले व आपण 'छोटे', 'आपण काय करू शकतो', असे म्हणून त्यांना शेवटी पुतळ्यात बंद करतो आणि वर्षातून दोन वेळाच त्यांची आठवण करतो, अशी खंत पदोपदी व्यक्त होते. स्वामीजींनी भारताची नवी ओळख जगाला करून दिली. तरुणांमध्ये नवचैतन्य भरण्याचे काम त्यांनी केले. तरीही त्यांच्या विचारांना विसरण्याचे पातक आम्ही करीत आहोत, असे मला वाटते. त्यांचे विचार जर योग्य रीत्या आपण आत्मसात केले असते, तर आपले महासत्तेचे स्वप्न मागेच पूर्ण झाले असते.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर समाजामध्ये भोगवाद व चंगळवाद बोकाळला. या काळातील कवीच्या सुरुवातीच्या कवितांतून हे प्रकर्षाने जाणवते. 'किनारा' मधील अनामवीराला विसरणारा समाज पाहिल्यावर मन व्यथित होते. त्यामुळेच कवी पुढे समाजाची दातृत्ववृत्ती जागृत करण्याचा प्रयत्न करतो ('करा दूर जरा हात'). स्वातंत्र्योत्तर काळात समाजाची राष्ट्रप्रेमाची भावनाही बदलताना दिसते. त्यामुळेच स्वातंत्र्यासाठी झटणाऱ्या वीरांनाही समाज विसरतो. या काळात लिहिलेल्या कुसुमाग्रजांच्या कवितांतून कवीची पुतळाविषयक जाणीव प्रगल्भ होताना दिसते. स्वगत व हिमरेषा या संग्रहांतून ती प्रगल्भता जाणवते, या संग्रहांतून छ.शिवरायांचे व स्वामी विवेकानंदांचे विचाररूप पुन्हा प्रकट व्हावे, अशी अभिलाषा कवी बाळगतात.

पुतळ्यांविषयीची समाजाचीही भावना स्वातंत्र्याला पंचवीस वर्षे होऊन गेल्यानंतरच्या काळात बदलत गेली. समाज अधिकच आत्मकेंद्रित बनत गेला. स्वातंत्र्यपूर्व काळात समाजसुधारणा व स्वातंत्र्य यांसाठी काम करणाऱ्या हिंदी मनुष्यांचे पुतळे उभारण्यात आले., (उदा. लो.टिळक, सुरेंद्रनाथ बॅनर्जी, न्या.रानडे, लाला लजपत राय); परंतु १९७० नंतर मात्र पुतळे उभारण्यामागे वेगळ्या प्रेरणा दिसून येऊ लागल्या. जात, धर्म, प्रादेशिकता इ. भेदांच्या अस्मिता प्रबळ होत चालल्या. नंतर पूर्वी उभारलेल्या पुतळ्यांचीही वंचना या अस्मितांच्या आधारे होऊ लागली. हा फरक कुसुमाग्रजांच्या कवितांतून उत्तम रीतीने प्रकट झाला आहे. त्यांच्या या काळातील छंदोमयी (१९८२), मुक्तायन (१९८४), पाथेय (१९८९) व मारवा (१९९९) या संग्रहांतूनही याची प्रचिती येते. 'छंदोमयी' या संग्रहातून कुसुमाग्रज महापुरुषांना 'संगमरवरी मरण' लाभू नये म्हणून 'प्रार्थना' करतात. महापुरुष मेल्यानंतर जागोजागचे संगमरवरी दगड जागे होतात, असा कवीचा अनुभव आहे.'पुतळा संस्कृतीचे' स्तोम वाढल्याने महापुरुषांच्या मृत्यूनंतर त्यांना एखाद्या चौकातील शिल्पात आत्मे चिरडून मारले जाते. पुन्हा कधीही विचाररूपानेही

जागृत न व्हावेत म्हणून 'बहुधा कायमचेच'. महापुरुषांच्या मरणाचे कटू सत्य सांगताना कुसुमाग्रज म्हणतात,

'महापुरुषाला मरण असते
दोनदा,
एकदा वैऱ्यांकडून
आणि नंतर भक्तांकडून
हे संगमरवरी मरण तुला न लाभो'[१०]

अशी मनोमन प्रार्थना कवीने केलेली आहे. महापुरुषांना समाजकंटकांकडून तर मरण मिळतेच; पण नंतर त्याला पुतळारूपाने उभा करून भक्तांकडूनच मिळालेले मरण भयानक व भयप्रद आहे. ते मरण कोणत्याही समाजसुधारकास न मिळो, हीच कवीची प्रार्थना आहे. कारण याच भूतलावर सॉक्रेटिसला विषाचा प्याला घ्यावा लागला, गौतम बुद्धांच्या व म.गांधीच्या नेत्रांतील करुणाश्रूसुद्धा याच भूमीवर सांडले. तसेच येशू ख्रिस्ताचे रक्तही इथेच सांडले आहे. त्यामुळे या पृथ्वीवर जन्मलेल्या सर्वसामान्य माणसाला 'टाक प्रवासी जपुनि जरा पाऊले' असा संदेश 'जपून' या कवितेतून देतात. तर 'मुक्तायन' या संग्रहात प्रौढ, प्रगल्भ व परिपक्व विचार स्पष्ट करणारी कविता भेटते. स्वातंत्र्यानंतर तीन दशके उलटल्यावर प्रकाशित झालेल्या या काव्यसंग्रहात 'शिवराया', 'अनावरण', 'पुतळा', 'ज्योतीराव', 'समाधान', 'अखेर कमाई' या कविता पुतळासंस्कृतीच्या द्योतक आहेत. स्वातंत्र्यानंतरच खऱ्या अर्थाने 'पुतळा संस्कृती' वृद्धिंगत होत गेली. त्याचाच परिणाम म्हणून या संग्रहात अशी भावना व्यक्त करणाऱ्या अनेक कविता अवतीर्ण झाल्या असाव्यात.

'शिवराया' या कवितेतून सध्याच्या समाजाने कोतेपणाची कशी परिसीमा गाठली आहे, याचे सार्थ दर्शन कवीने घडविले आहे. छ.शिवरायांचा 'प्रदीप्त इतिहास' आपण अभ्यासला; पण त्यातील तेजस्विता, अस्मिता, जाज्वल्य देशप्रेम घेण्याऐवजी आपल्या राजकीय पक्षांनी त्यांच्या नावाचा वापर केला; त्यांना जातींच्या बंधनात बंद केले, असे जळजळीत वास्तव कवितेत मांडले आहे. कवी म्हणतो, 'तुम्हाला आम्ही आमच्या दीड वितीच्या गटारलेल्या डबक्यातील महान बेडूक करू पाहत आहोत.' 'शिवाजी' हे नाव एक सोईस्कर वापराची वस्तू म्हणून आम्ही पाहतो आहोत. जात, धर्म, प्रदेश, पक्ष, संघटना यांमध्ये शिवरायांना न अडकवता 'त्यांचे आठवावे रूप, आठवावा साक्षेप' असेच कवीला सांगायचे आहे, तर 'अनावरण' या कवितेत कवीने डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या पुतळ्याचे अनावरण करताना त्यांच्याशी साधलेला संवाद शब्दबद्ध केला आहे. पण एका ब्राह्मण व्यक्तीने केलेले अनावरण नवबौद्ध मान्य कसे करतील? हेही एक सामाजिक वास्तव कवितेतून व्यक्त केले आहे. युगप्रवर्तक - महामानव कवितेचा विषय होऊच शकत नाहीत, याची जाणही कवीला आहेच. त्यामुळे कवीने स्वत:ला खोल पाताळात भिरकावून दिले व त्या तळावरून पाहताना म्हटले,

'त्या तळावरून
मी तुमच्या पुतळ्याकडे पाहिलं
तेव्हा पुतळा दिसलाच नाही,
दिसत होता
जाणवत होता
एक विराट दाहक तेजोगोल
सूर्याच्या कोरोनासारखा'[११]

'स्व'- चा त्याग करून व्यक्ती ज्या वेळी इतरांकडे पाहते, त्या वेळी नक्कीच तिला 'अहम् ब्रह्मास्मि' असणाऱ्या मानवातील तेजाचेच दर्शन घडते. हे आध्यात्मिक सत्य कवीने या कवितेतून अनुभवले आहे. महामानवांच्या भव्यत्वाचे व दिव्यत्वाचे दर्शन घडण्यासाठी सर्वसामान्यांना सर्व पूर्वग्रह बाजूला ठेवून मानवतेच्या तळाशी जावे लागेल; तेव्हाच महात्म्यांचा मोठेपणा आपणाला दिसेल व तो चिरकाल टिकेल, हे वास्तव कवितेतून आले आहे. 'पुतळा' या कवितेत दगडी मूर्तीमध्ये परमेश्वर शोधण्याचा कवीचा प्रयत्नही असफल ठरल्याचे कवी मान्य करतो.

'ज्योतीराव' या कवितेत त्यांचा 'देहाकार पुतळा' राजधानीत उभा राहिला म्हणून कवी आनंद व्यक्त करतो. 'ज्योतीराव परवडत नसले तरी, त्यांचे पुतळे आम्हाला परवडतात', हे वास्तवही कवितेतून मांडले आहे. वर्षातून एकदा दोन पैशांचा हार व एखादे भाषण हेच आजच्या समाजाच्या दृष्टीने ज्योतीरावांचे महत्त्व.

त्यांचा शेतकऱ्यांचा आसूड, गुलामगिरी, तृतीय रत्न, सार्वजनिक सत्यधर्म हे सगळं आम्ही विसरलो. त्यांचे शैक्षणिक, सामाजिक कार्य 'आम्ही माळ्यांच्या जमातीत रेटलं' आणि आम्ही त्यांना महात्मा म्हणून चौकात उभं केलं, 'काकादिक पक्ष्यांच्या, विष्ठाप्रधान सहवासासाठी'. ज्योतीरावांचा पुतळा उभारला म्हणजे आमचे काम संपले, असा विचार करणारा राजकीय व सामाजिक प्रवाह वाढल्याने वर्षातून एकदा (जयंती) किंवा दोनदा (पुण्यतिथी) आठविणारा समाज पाहिल्यानंतर कवी उपहासाने 'हेही नसे थोडके' असे म्हणतो. त्या वेळी आम्हाला जयंतीच्या निमित्ताने तरी त्यांची आठवण होते, हे तरी बरे असे म्हणण्याची वेळ येते. तर 'समाधान' या कवितेत कवी म्हणतात, 'जयंतीच्या उत्तररात्री, सर्वत्र सामसूम झाल्यावर, पुतळ्याने झटकून टाकले अंगाखांद्यावर साचलेले, असंख्य नमस्कार'. (मुक्तायन, पृ.१०७) युगपुरुषांच्या पुतळ्यांना हे असले पोकळ नमस्कार नकोसे वाटतात. त्यापेक्षा कावळ्यांचा असह्य सहवासही त्यांना सुसह्य वाटायला लागतो. या काव्यातून कुसुमाग्रजांची उपहासात्मक शैली व समाजाची दांभिकता या दोन्हींचे एकत्र दर्शन घडते. महापुरुषांनी घालून दिलेल्या वाटेवरून जाण्यापेक्षा आपण त्यांना जातिपातीत बंद करतो, त्या वेळी आपण आयुष्यात नक्की काय कमावले? याचा पडताळा पाच पुतळे 'अखेर कमाई' या कवितेत घेतात. या कवितेत मध्यरात्र उलटून गेल्यावर शहरातील पाच पुतळे एकत्र येतात आणि दु:ख करू लागतात. महात्मा ज्योतिबा फुल्यांना दु:ख आहे, 'मी झालो फक्त माळ्यांचा' याचे; छ.शिवरायांना दु:ख आहे, ते 'मी फक्त मराठ्यांचा' याचे, तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना 'मी फक्त बौद्धांचा' तर लो. टिळकांना 'मी तर फक्त चित्पावन ब्राह्मणांचा'. या चौघांनी आपली व्यथा मांडल्यावर पाचवा पुतळा म्हणतो, 'तरी तुम्ही भाग्यवान, एकेक जातजमात तरी तुमच्या पाठीशी आहे, माझ्या पाठीशी मात्र, फक्त सरकारी कचेऱ्यांतील भिंती!' (मुक्तायन, पृ.१०९) ही व्यथा मांडणारा पुतळा आहे, महात्मा गांधी यांचा. म.गांधी व त्यांच्या कार्याला आम्ही एवढे मोठे केले, की त्यांना फक्त सरकारी कचेऱ्यांमध्ये स्वातंत्र्यकाळातील अनागोंदी कारभार बघायला टांगून ठेवले. या प्रत्येक पुतळ्याला 'हेचि फळ काय मम तपाला', असे म्हणावेसे वाटत नसेल काय? 'अखेर कमाई' ही कुसुमाग्रजांची सर्वश्रुत असणारी कविता आहे. जणू ही कविता म्हणजे त्यांच्या समग्र पुतळाविषयक कवितांचे सारच आहे. या एकाच कवितेतून भारतीय जनता किती कृतघ्न बनत चालली आहे, याचे प्रत्यंतर येते. निदान या पाच महामानवांना तरी सर्वांनी 'आपले' मानायला हवे होते. म्हणजे आपल्या राज्यासमोरीलच नव्हे, देशासमोरीलही सर्व समस्या दूर झाल्या असत्या. तर 'पाथेय' या संग्रहातील बऱ्याच कवितांमधून स्वातंत्र्य मिळूनही, भारतीय जनतेला अपेक्षाभंगालाच सामोरे जावे लागले, याचे दु:ख व्यक्त होते. 'पुतळे आभार मानतात (९ऑगस्ट)' या भारतीय क्रांतिदिन मानलेल्या दिवशी समाजाला पुतळ्यांची आठवण होते. मग प्रत्येकजण हातात हार व मुखात जयघोषाची ललकारी घेऊन पुतळ्यांकडे धावतो. त्यांना लष्करी कुर्निसातही करतो. पण यांतील एकही गोष्ट क्रांतिकारकांना नको असते. त्यांनी फासावर जाताना व स्वत:चा संसार जाळताना 'रंकाच्या माथ्यावर छप्पर, उघड्या अंगावर वस्त्र, उपाशी पोटात अन्न', हे मनोहारी स्वप्न पाहिले होते. पण आज क्रांतिदिनी स्वातंत्र्य सैनिकांचा भ्रमनिरास होतो. त्यांच्या समर्पणामागची देशभक्तीची भावना न समजलेले समाजमन व त्यांचे कल्पनेतही नसताना मिळालेले कुर्निसात पोचल्याचे उपरोधिक आभार मानायलाही ते विसरत नाहीत. पण शेवटी मात्र

'घोष विरल्यावर,
दिवे विझल्यावर
मध्यरात्रीच्या निवांतात
गिधाडांचे थवे आले
त्या स्वप्नाचे तुकडे
चोचीत घेऊन - तेही पोचले'[१२]

अशा प्रकारे क्रांतिकारकांनी पाहिलेली मनोहारी स्वप्ने शेवटी मृतवत होऊन गिधाडांच्या थव्यांनी म्हणजेच आजच्या स्वातंत्र्याची फळे चाखणाऱ्या 'मी आणि माझं' यामध्ये आत्ममग्न असणाऱ्या समाजातील सुधारलेल्या व्यक्तींनी गिळंकृत केल्याचे वास्तव व्यक्त होते. 'दिलगीर आहोत' या कवितेत बुद्ध, ख्रिस्त, गांधी यांच्या नावाने घोषणा देणे, त्यांचा फोटो घरात वा कार्यालयात लावणे किंवा






एखादा सिनेमा त्यांच्या जीवनावर काढणे ठीक आहे; पण ते आमच्या व्यवहारी जीवनात आले, तर मात्र त्यांना 'गोळ्या झाडण्यावाचून आम्हाला गत्यंतरच नसते', असे दिलगिरी व्यक्त करून कवी सांगतात. तर 'भिंतीवर' या कवितेत कवीने 'काल रस्त्यावरून चालणारी माणसं आज भिंतीवरील तसबिरी झाली आहेत', हे मानवी जीवनाचे नश्वरत्व अधोरेखित केले आहे. 'तो एक—' या कवितेतून भारतीय स्वातंत्र्यलढ्यात बंदुकीच्या गोळ्या आपल्या छातीवर झेलणारा स्वातंत्र्यसैनिक गिरगावच्या नाक्यावर 'शिशिरपान गळून पडावं' इतक्या सहजतेने मरून पडला, तरी त्याच्याकडे कोणाचेही लक्ष नाही. त्याचा त्याग, त्याचे समरसशील जीवन यांच्याकडे सहजपणे झालेले दुर्लक्ष हे समाजाच्या उद्दामपणाचे द्योतकच आहे. तर 'शलाका' या कवितेत कवी म्हणतात, 'तो मी न, चौथऱ्याला, पुतळा उभा जयाचा। हा मी, तळी तरूच्या, निष्पर्ण गात गाणी।।' (पाथेय, पृ.८५) असा अलिप्तपणा स्वातंत्र्यसैनिकांच्या वाट्याला येतो त्या वेळी समाज म्हणून आपण किती निर्ढावलेले झालो आहोत, याचे सार्थ दर्शन घडते. 'मारवा' या संग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे कुसुमाग्रजांनी अनंतफंदींचे स्मरण करून लिहिलेला प्रासंगिक फटका 'स्वातंत्र्यदेवीची विनवणी' या कवितेचा समावेश प्रस्तुत संग्रहात आहे. पन्नाशीची उमर गाठलेल्या भारतमातेला अभिवादनाची गरज नाही; तर भारतीय जनतेसमोर ठाकलेल्या एकविसाव्या शतकातील आव्हानांची जाणीव स्वातंत्र्यदेवता करून देते. दुःख, दैन्य, दारिद्र्य, गरिबी, माणुसकी, स्त्री-स्वातंत्र्य अशा अनेक आव्हानांना सामोरे जायचे असल्याने 'सूर्यकुलाचा दिव्य वारसा प्रिय पुत्रांनो तुम्हा मिळे' ही भारतीय अस्मिताही जागृत करतात. या सर्व जाणिवांबरोबरच पुतळा संस्कृतीबद्दल विचार मांडताना कुसुमाग्रज म्हणतात, 'बोथट पुतळे पथापथावर ही थोरांची विटंबना। कणभर त्यांचा मार्ग अनुसरा वांझ गोडवे गाउ नका।।'[१३] शहरांतील चौकाचौकांत व रस्तोरस्ती उभे केलेले पुतळे ही थोरांच्या विचारांची कवीला विटंबनाच वाटते. त्यासाठी त्यांनी 'बोथट पुतळे' असा शब्द वापरला आहे. आजच्या आत्मकेंद्रित समाजाला थोर व्यक्तींचे वांझ गोडवे गाण्यापेक्षा त्यांचा 'कणभर' मार्ग अनुसरावा, अशी छोटी अपेक्षा कवीने व्यक्त केली आहे.

कवी पहिल्या कवितासंग्रहात पुतळ्यांना 'थडगे' असा शब्द वापरतो, तर 'मारवा' या संग्रहात कवी 'बोथट पुतळे' असा शब्द वापरतो. यातून समाजाची मानसिकता व कवीच्या लेखनातील बदलाचे प्रत्यंतर घडते. प्रारंभीच्या कवितेत महापुरुषांच्या विचारांची आपण दखल घेत नाही, अशी फक्त खंत (कोण तुम्हा गाइल हो, अभिषेकिल अश्रुजले) व्यक्त करणारा कवी पुढे मात्र महापुरुषांच्या विचारांचे जतन व्हावे म्हणून अट्टहास धरतात ('करा दूर जरा हात') व असे पुतळारूपी मरण कोणत्याही महापुरुषाच्या वाट्याला येऊ नये, अशी सार्थ भावनाही (हे संगमरवरी मरण तुला न लाभो) शेवटी व्यक्त करतात. तर 'पुतळे आभार मानतात' या कवितेतून कवीने आपली वेदना स्पष्टपणे मांडली आहे. कवीच्या लेखणीतील हा बदल म्हणजे महापुरुषांच्या विचारांविषयीची त्यांची तळमळ दिसून येते.

**समारोप**

अशा प्रकारे उपरोधिक आणि उपहासात्मक भाषेत कुसुमाग्रज काव्यातून 'पुतळा संस्कृती'चा समाचार घेतात. त्यांच्या ह्या एकंदरच कवितेतून आपण महापुरुषांच्या विचारांचा पराभवच केला, हे सिद्ध होत नाही का? त्यांची वरील विषयाची प्रत्येक कविता आजच्या भोगवादी समाजाच्या डोळ्यात झणझणीत अंजन घालते. खरेतर चौकातून जाताना या पुतळ्यांकडे पाहिल्यावर त्यांच्या कार्याची आठवण व्हायला पाहिजे. त्यांच्यापुढे नतमस्तक होऊन आपण त्यांचे पाईक व्हायला हवे. पण असे घडत नाही. त्यांच्या पुतळाविषयीच्या कविता खूप गाजल्या. त्यांनी मराठी मनाचा ठाव घेतला, पण त्या कवितांतील आशयातून समाजाने काय घेतले? हा प्रश्न अजूनही अनुत्तरितच आहे, हीच मोठी खंत आहे. कुसुमाग्रजांना दिव्यत्वाची ओढ असल्याने त्यांच्या कित्येक कवितांतून पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंचमहाभूतांची शब्दपूजा त्यांनी मांडल्याचे दिसून येते. समाजसुधारकांचे यांचे व्यक्तिमत्त्वही कुसुमाग्रजांच्या प्रतिभाशक्तीला साद घालते, यांचे सार्थ प्रत्यंतर अभ्यासाअंती घडते. कुसुमाग्रजांची वाणी तेजस्वी, विचार तेजपूजक व वृत्ती तेजाची अभिलाषा बाळगणारी असल्याने त्यांनी तेजःपुंज व्यक्तिमत्त्वांचा वेध पुतळाविषयक कवितांतून घेतला.

अनुक्रमणिका






प्रत्येक भारतीयाने या मार्गावर चालावे, असा हा राजमार्ग आहे; परंतु या मार्गावरून जाताना कोण दिसते?

कविवर्य कुसुमाग्रज स्वातंत्र्यवीरांना, सैनिकांना, महात्म्यांना जसे विसरत नाहीत, तसेच भारतीय स्वातंत्र्यासाठी लढलेल्या सामान्यांतील सामान्य व्यक्तीलाही ते विसरत नाहीत, हे त्यांचे वेगळेपण आहे. 'नमस्कार ऑगस्ट पुत्रांनो!' या लेखात कवी (लेखक) म्हणतात, "...म्हणून मला वाटतं, स्वातंत्र्यदिनाच्या उत्सवात व्यासपीठावर गांधी, नेहरू, सुभाष यांच्या तसबिरीशेजारी एक चित्र नसलेली तसबीर असावी. ते चित्र असेल चेहरा नसलेल्या सामान्य माणसाचं – ऑगस्ट पुत्राचं! पहिला नमस्कार त्यालाच व्हायला हवा." (शिरवाडकर वि. वा. :'मराठीचिये नगरी', पृ.१२८) 'संस्थांची समांतर सत्ता' या लेखात कवी (लेखक) म्हणतात, "...जातीयतेची ही व्याधी खास स्वदेशी बनावटीची असल्यानं-मेड इन इंडिया - तिला जगाच्या बाजारात कोठेही औषध मिळणार नाही. ते इथेच निर्माण व्हावं लागेल. तसे प्रयत्न ज्या महात्म्यांनी केले, त्यांनादेखील आपण त्यांच्या जातीच्या कपाटात बंदिस्त करून ठेवत आहोत. जयंती-मयंतीला उपचार म्हणून आपण त्यांच्या पुतळ्यांच्या गळ्यात हार घालतो आणि त्याच हातांनी त्यांच्या विचारांच्या होळ्या चौकात पेटवत राहतो." (शिरवाडकर वि.वा : 'मराठीचिये नगरी', पृ.११५) असा हा प्रतिभावंत कवी अखेरपर्यंत 'दिव्यत्त्वाची जेथ प्रचिती, तेथे कर माझे जुळती' या वचनाप्रमाणे शोधात राहिला. त्यांच्या कवितांतून, लेखांतून, भाषणांतून, नाटकांतून व समग्र साहित्यातून याची प्रचिती आल्याशिवाय राहत नाही.'

**संदर्भ –**

१) कुसुमाग्रज : 'विशाखा', तृतीयावृत्ती, पुणे, पृ.७ (प्रस्तावना), १९४७.
२) तत्रैव : पृ.१२.
३) डॉ.पुंडे दत्तात्रय, डॉ.तावरे स्नेहल (संपा.) : 'त्रिदल', स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे आ. दुसरी, जाने.१९९४.
४) कुसुमाग्रज : 'जीवन लहरी', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पंचमावृत्ती, २०१०, पृ.२२.
५) कुसुमाग्रज : 'विशाखा', उनि. पृ.९२.
६) कुसुमाग्रज : 'किनारा', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, १९५२, पुनर्मुद्रण, २००३, पृ. १२६.
७) कुसुमाग्रज : 'मराठी माती', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, आवृत्ती, २००३, पृ.११८.
८) कुसुमाग्रज : 'स्वगत', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती, १९६२, पृ.८.
९) कुसुमाग्रज : 'हिमरेषा', प्रकाशक. देशमुख आणि कंपनी, पुणे, १९६४, पृ.८४.
१०) कुसुमाग्रज : 'छंदोमयी', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९८२, पृ.२६.
११) कुसुमाग्रज : 'मुक्तायन', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९८४, पृ.३७.
१२) कुसुमाग्रज : 'पाथेय', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९८९, पृ.१४.
१३) कुसुमाग्रज : 'मारवा', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पुनर्मुद्रण, २०११, पृ.३.

☆☆☆

अनुक्रमणिका

# लेखकांचा परिचय

◈ **चंद्रकांत प्रल्हाद पांढरीपांडे**

केंद्र सरकारच्या रिजनल इन्स्टिटट्युट ऑफ एज्युकेशन, भोपाळ येथून भाषा विभागाचे प्रमुख म्हणून निवृत्त. भारत सरकारतर्फे मॉरिशस येथे मराठीचे सल्लागार म्हणून नियुक्त (१९८९-९१). भाषा, साहित्य, शिक्षण, समीक्षा इत्यादी. विषयांवर अनेक लेख प्रसिद्ध.

***पत्ता :—*** सी-९, श्री सुवर्ण अपार्टमेंट, लोकमान्य कॉलनी, उत्सव सभागृहामागे, पौड रोड, पुणे -४११ ०३८, भ्रमणध्वनी : ०९८२२३२९०७२.

◈ **डॉ. अशोक चौसाळकर**

राज्यशास्त्र विभाग प्रमुख, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

***पत्ता :—*** ४१६ आर. के. नगर सो. ६, पाचगाव, कोल्हापूर. ४१६ ०१२, भ्रमणध्वनी - ९४२११७२८६८.

◈ **विश्वास दांडेकर**

निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमा महामंडळ; इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रुची व अभ्यास; वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन.

***पत्ता :—*** 'मालवती' १७ ब, कांगा कॉलनी, सदरबाजार, सातारा-४१५ ००१.
दूरध्वनी :- (०२१६२) २३५२५४.

◈ **डॉ. माधवी देसाई**

शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागात प्राध्यापिका. ग्रेस यांची कविता : स्वरूप शोध (संध्याकाळच्या कविता आणि चंद्रमाधवीचे प्रदेश या कवितासंग्रहांच्या अनुषंगाने या विषयावर एम. फिल. पदवी). पु. शि. रेगे आणि ग्रेस य़ांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा या विषयावरील शोधप्रबंध पीएच.डी.साठी सादर. विविध नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.

***पत्ता :—*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली ४१६ ४१६. भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६

◈ **नीलेश जोशी**

एम. ए., एम. फिल. पी एच. डी (संस्कृत), व्याकरणशास्त्री (बी. एच. ओ.). संस्कृत विभागात प्राध्यापक. संस्कृत भाषेत अनेक लेख प्रसिद्ध.

***पत्ता :—*** श्री व सौ अपार्टमेंट, ए. विंग, ए-१, गोडोली, शाहूनगर, सातारा-४१५ ००१.
भ्रमणध्वनी :- ९२२६४१९३२३.

◈ **प्रा. संग्राम गोपीनाथ थोरात**

मराठी विभाग, किसनवीर महाविद्यालय, वाई, जि. सातारा.

***पत्ता :—*** मु. अमृतवाडी, पो. पाचवड, ता. वाई. जि. सातारा, पिन- ४१५ ५१३

अनुक्रमणिका

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

रजिस्टर क्र. **11697/57**



हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक घ. वा. जोशी यांनी मन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ ... 
मनोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध ...

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रजिस्टर क्र. 11697/57




मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे ... सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई